प्रकाशक / पुस्तक मिळण्याचे ठिकाण :
श्री. वि. वा. भातखंडे
१८, न्यू संदीप सोसायटी
जिजाईनगर, संत नामदेव पथ,
डोंबिवली (पूर्व)
टेलिफोन : २४३८०५३

श्री. अ. ना. फाटक
२/५, डोंगरे बिल्डिंग,
मानपाडा रोड,
डोंबिवली (पूर्व)
टेलि. २८६२६१०

श्री. वि. मो. कर्णिक
एफ - ४०५, सर्वोदय पार्क,
नांदिवली, डोंबिवली (पूर्व)
टेलिफोन : २८२०६३६

प्रथम आवृत्ती, नोव्हेंबर २००९
मूल्य : २५/- फक्त

मुद्रक :
राधिका प्रिंटर्स,
८, नव-वृषाली कॉ.ऑ.हौ.सो.,
आगरकर रोड,
डोंबिवली (पूर्व)
फोन नं. २४४७७१९



## चार शब्द

हिंदू धर्मात सणांची रेलचेल आहे असे वरवर पहाता वाटते. पण बारकाईने पाहिल्यास जे सण सर्वसाधारण हिंदू साजरे करतात ते संपूर्ण वर्षात फक्त १८ आहेत. प्रस्तुत पुस्तकात ह्या सणांचे विश्लेषण केले आहे.

वाचकांच्या मनात साहजिकच असा प्रश्न येईल की सणांचे विश्लेषण म्हणजे काय ? आणि ते करायची गरज काय ? त्याच्या स्पष्टीकरणार्थ एवढेच सांगावयाचे आहे की पारंपारिक रीत्या सण जसे साजरे केले जातात तसेच ते आपण करतो. पण बहुतेकांना सणांमध्ये करावयाच्या गोष्टी का करतो, त्याच्यामागची भूमिका काय आहे, त्याचे काय फळ आहे ह्याची जाण असतेच असे नाही. (नसतेच असेही नाही !) प्रस्तुत पुस्तकात सर्वसामान्यांच्या मनात येऊ शकणाऱ्या प्रश्नांची यथाशक्ति उत्तरे देण्याचा प्रयत्न केलेला आहे. सध्याची पिढी कामामध्ये इतकी व्यग्र असते की सणांविषयी माहिती देणारे, सुटसुटीत व तरी पण परिपूर्ण, पुस्तक त्यांच्या हातात ठेवावे हा पण मानस आहेच.

उदाहरण द्यायचे झाल्यास प्रत्येक सणाला सामायिक गोष्ट म्हणजे देव-देवतांना नैवेद्य दाखविणे ही होय. पण ह्या सदैव लागणाऱ्या उपचारात सुध्दा बरेच अज्ञान आढळून येते. बहुतांश लोक नैवेद्याच्या ताटाभोवती पाणी फिरवून ''नैवेद्यम् समर्पयामि'' असे म्हणण्यात पूर्तता झाली असे समजतात. वास्तविक नैवेद्य दाखविण्याची अशी शास्त्रोक्त पध्दत आहे. नैवेद्याच्या ताटाखाली अथवा वाटीखाली चौकोनी मंडळ काढावे. (देवासाठी चौकोनी मंडळ, पितरांसाठी गोल मंडळ तर प्रेतासाठी त्रिकोणी मंडळ काढण्याची प्रथा आहे.) ही मंडळे काढण्यामागचा उद्देश असा की पूर्वीच्या काळी मातीच्या जमिनी असून त्या शेणाने सारविलेल्या असत. त्यामध्ये विविध प्रकारचे जीवजंतू असणे हे नैसर्गिकच होते. ह्या जंतूचा प्रवेश पत्रावळीच्या फटींतून होऊ नये म्हणून जेवढ्या आकाराची पत्रावळ, तेवढे मंडळ काढत. पूर्वी नैवेद्य हिरव्यागार पानांच्या पत्रावळींवर वाढत. त्या पानांच्या देठांमध्ये सुध्दा जीवाणू असत. त्यांचा प्रवेश अन्नामध्ये होऊ नये म्हणून पत्रावळ धुऊन त्याखाली पाण्याचे मंडळ काढत. सध्या मात्र जमिनी शेणाच्या नसल्याने पूर्वीप्रमाणे मोठे मंडळ न काढता प्रतिकात्मक छोटे मंडळ काढले जाते. ताटाभोवती पाणी

फिरवण्या मागचा उद्देशसुध्दा जमिनीवरील जंतूना अन्नामध्ये प्रवेश प्रतिबंध करणे हा आहे.

मनुष्यप्राण्याप्रमाणेच देवदेवतांच्या ठायीसुध्दा पंचमहाभूतांचा वास असतो. नैवेद्य दाखविणे म्हणजे पंचवायूंमुळे निर्माण झाले त्या ब्रह्माला अन्न अर्पण करणे. ते अन्न अर्पण करताना खालील सहा मंत्रांचा उच्चार करावा.

'' ॐ प्राणायस्वाहा'' (प्राण वायुला अन्न देणे)

'' ॐ अपानायस्वाहा'' (अपानवायुला अन्न देणे)

'' ॐ व्यानायस्वाहा'' (व्यानवायुला अन्न देणे)

'' ॐ उदानायस्वाहा'' (उदानवायुला अन्न देणे)

'' ॐ समानायस्वाहा'' (समानवायुला अन्न देणे)

'' ॐ ब्रम्हणेस्वाहा'' (ब्रम्हाला अन्न अर्पण करतो)

नैवेद्य दाखविताना डोळे मिटून घ्यावे कारण नैवेद्याचा स्वीकार करण्यास देवदेवता उपस्थित झाल्यास त्यांचे तेज आपणास सहन होणार सुध्दा नाही.

नैवेद्या विषयीचा उल्लेख हा केवळ वानगीदाखल केला आहे. अशाच प्रकारचे जे प्रश्न सर्व सामान्यांच्या मनात येतात त्यांची उत्तरे विविध सणांची माहिती देताना दिली आहे.

पुस्तकात दिलेल्या माहितीचा संदर्भ हवा असल्यास त्याचा खुलासा करणे ही लेखक आपली जबाबदारी समजतात.

पुस्तकाचे हस्तलिखित तयार करण्यात तसेच प्रुफ वाचन करण्यात श्री. अनंत नारायण फाटक व सौ. स्वाती प्रितम दादरकर ह्यांची बहुमूल्य मदत झाली. श्री. फाटक ह्यांनी काही महत्वाचे संदर्भ दिले. लेखक त्या दोघांचे तसेच निर्दोष छपाईबद्दल श्री. सुनील डागा, राधिका प्रिंटर्स, डोंबिवली ह्यांचे ऋणी आहेत.

ज्याप्रमाणे वाचकांनी आमच्या ''संस्कार दर्शन'' ह्या पुस्तकाचे स्वागत केले तसाच प्रतिसाद ह्याही पुस्तकाला ते देतील अशी अपेक्षा !

लेखक



## अनुक्रमणिका

## १. गुढी पाडवा

हिंदू दिनदर्शिकेतील पहिला सण म्हणजेच गुढी पाडवा ! हिंदू धर्मातील जे साडेतीन मुहूर्त सांगितले आहेत. त्यातील पहिला पूर्ण मुहूर्त गुढी पाडवा हा होय.

### केव्हा ?

हिंदू दिनदर्शिकेप्रमाणे चैत्र शुध्द प्रतिपदा.

इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे सर्वसाधारणपणे मार्च महिन्याचा शेवटचा आठवडा अथवा एप्रिल महिन्याचा पहिला आठवडा.

### काय करावे ?

चैत्र शुध्द प्रतिपदेला अरूणोदय व सूर्योदय ह्यांच्या मध्ये म्हणजेच सकाळी ५.४५ ते सूर्योदयामधील काळांत गुढी उभारावयाची असते. गुढी उभी करणाऱ्या पुरूषांनी मंगलस्नान करून नित्य नैमित्तिक पूजा आदि कार्ये आटोपून गुढी उभारण्याचे कार्य करावे.

घराच्या पुढील दारात रांगोळी काढून त्यावर चौरंग अथवा पाट ठेवून त्यावर गुढी उभारावी. हल्ली मात्र जागेच्या अभावी लोक गॅलरीत अथवा घराच्या दर्शनी विभागात गुढी उभारतात.





गुढीसाठी वेळू (हिरवा बांबू), कलश, गंध, अक्षता, पुष्प, हळद, कुंकू, सुशोभित कापड, पुष्पमाला, कडुनिंबाची डहाळी हे साहित्य लागते. वेळूवर ठेवण्याचा कलश कुंकवाने अलंकृत करून घ्यावा. कलशामध्ये कापड, कडुनिंबाची डहाळी, पुष्पमाला हे घट्ट बसवून वेळू पाटावर अथवा चौरंगावर उभा करावा. आधार देण्यासाठी सुतळीने तो वेळू खांबाला अथवा योग्य त्या आधाराला बांधावा. कलश हा उपडा असतो, हे लक्षात घेऊन वाऱ्याने अथवा कोणत्याही धक्क्याने पडू नये, म्हणून वेळूला व्यवस्थित बांधावा.

त्यानंतर गुढीची पंचोपचार पूजा करून, उदबत्ती-निरांजन दाखवून दुध-साखरेचा नैवेद्य दाखववा. त्याचप्रमाणे अमृतवृक्षाची म्हणजेच कडुनिंबाची कोवळी पाने घेऊन हिंग, जिरे, मीठ, गूळ, मिरे, डाळ हे एकत्र वाटून त्याचे चूर्ण घरातील प्रत्येकाने अनशापोटी भक्षण करावे. ह्याच दिवशी हिंदू धर्माचे नवे संवत्सर सुरू होत असल्याने पंचांगाची ही पंचोपचार पूजा करून पंचांगात सांगितलेले संवत्सर फळ वाचावे अथवा श्रवण करावे.

गुढीच्या महानैवेद्यासाठी वरण-पुरण अथवा पक्वानाचे भोजन तयार करावे. हा नैवेद्य दुसरा प्रहर संपल्यावर व तिसऱ्या प्रहराचे सुरवातीला म्हणजेच १२.०० ते १२.३० च्या दरम्यान दाखववा. सूर्यास्तापूर्वी गुढी उतरवावी. गुढीला सूर्यास्त दिसू देऊ नये. गुढी उतरवताना अक्षता वाहण्याची आवश्यकता नाही. गुढी हा फक्त ब्रम्हदंड आहे, देव नाही, म्हणून गुढीची प्राणप्रतिष्ठा अथवा विसर्जन नसते.

लग्न व मुंज वर्ज्य करता, बाकी कोणत्याही शुभकार्यास गुढी पाडवा हा योग्य मुहूर्त समजला जातो. त्यामुळेच ह्या दिवशी काही ना काही खरेदी करण्याची (शक्यतो जमीन-जुमला, सोने, चांदी वगैरे) प्रथा आहे. विवाह नक्की करणे, पत्रिका छापावयास देणे, अशी शुभ कार्ये सुध्दा ह्या दिवशी मुद्दाम केली जातात. तसेच नवविवाहित दांपत्याला बोलावून, वराचे श्वशूर दांपत्याला योग्य अशी वस्तू देऊन त्यांचा आदराने मान राखतात.

### का ?

गुढी पाडवा चैत्र शुध्द प्रतिपदेलाच का ? तर ह्या तिथीला ब्रम्हदेवाने सृष्टी निर्माण करून ब्रम्हदंड उभा केला. ब्रम्हदंड वेळूचा असणे,

ह्यामागे सुध्दा कारणमीमांसा आहे. ती म्हणजे वंशवृध्दी (बांबूचा डोळा हा हमखास रुजतोच), खंबीरपणा (बांबू न झुकता उभा असतो) व एकत्र समूहाने जीवन व्यतीत करण्याचे बांबू (बांबूचे बेटवन असते) प्रतीक आहे. ह्याच दिवशी प्रभू श्रीरामचंद्राने वनवासातून अयोध्येला परत येण्याची योजना ब्रम्हदेवाच्या संमतीने केली. त्या दिवसाचा उत्सव म्हणून गुढी उभारून सृष्टीनिर्मात्याला अभिवादन करावे.

## हे केल्याचे फळ

गुढी उभारणे तसेच संवत्सर फळ वाचल्याचे फलित म्हणजे चैत्र शुध्द प्रतिपदेपासून फाल्गुन वद्य अमावस्येपर्यंत म्हणजेच संपूर्ण वर्ष सुख, समाधान, समृध्दी, शांती, किर्ती, विजय, आनंद, धनधान्य, पुत्र-पौत्र इत्यादी प्राप्त होतात.



## २. चैत्री नवरात्र

गुढी पाडव्याबरोबर येणारा पहिला उत्सव म्हणजे चैत्री नवरात्र होय. सर्वसाधारणपणे लोक आश्विन महिन्यातील नवरात्र साजरे करतात. परंतु हे नवरात्र सुध्दा साजरे करण्याची पध्दत आहे.

## केव्हा ?

हिंदू दिनदर्शिकेप्रमाणे चैत्र शुध्द प्रतिपदा ते चैत्र शुध्द नवमीपर्यंत हा उत्सव चालतो. इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे मार्च महिन्याचा शेवटचा आठवडा अथवा एप्रिल महिन्याचा पहिला आठवडा व त्या दिवसापासून पुढील नऊ दिवस.

## काय करावे ?

प्रत्येक घराण्यातील कुलदेवता नवरात्रांत बसविली जाते. चैत्र शुध्द प्रतिप्रदेला प्रथम नित्य नैमित्तिक पूजा करून, त्यानंतर गुरूजींकडून कुलदेवतेची विधीपूर्वक स्थापना केली जाते. म्हणजेच कुलदेवतेच्या टाकावर गाईच्या दुधा-चा तसेच उष्णोदकाचा अभिषेक करून, त्या टाकाची स्थापना षोडशोपचारे पूजा करून केली जाते. ह्यासाठी तांब्याचा अथवा चांदीचा कलश घेऊन, त्यांत पंच पल्लव ठेवतात. (आंबा, उंबर, पिंपळ, वड व पायरी ह्यांची पाने) त्यावर चांदीचे अथवा तांब्याचे तबक अथवा वाटी तांदळाने भरून ठेवून त्यावर कुलदेवतेचा टाक ठेवतात. त्यानंतर पंचोपचार पूजा होते. म्हणजेच गंध, अक्षता, हळद, कुंकू, फूल वाहून देवीला वस्त्रालंकारीत केले जाते. ह्या स्थानावरून देवीला हलवत नसल्यामुळेच 'देवी बसवणे' असे म्हटले जाते.

पूजा झाल्यानंतर वरण-पुरणासह महानैवेद्य दाखवितात. दिवसांतून तीन वेळा म्हणजेच सकाळी, दुपारी भोजनापूर्वी व सायंकाळी आरती केली जाते. चैत्र शुध्द नवमीला तिचे उत्थापन केले जाते. अश्विनी नवरात्रीत ज्याप्रमाणे झेंडूच्या अथवा तिळाच्या फुलांच्या अथवा विड्याच्या पानांच्या माळा घातल्या जातात, त्याप्रमाणे माळा घालण्याची प्रथा चैत्री नवरात्रींत नाही. तसेच धान्य पेरून रोप वाढविण्याची प्रथा पण नसते. शक्य असल्यास नऊचे-नऊ दिवस किंवा कमीत कमी उठता बसता म्हणजे पहिल्या व नवव्या दिवशी एका सुवासिनीला भोजन देऊन, दक्षिणा देऊन, तिचा सत्कार करावा.

जे जे आपण करणार आहोत, त्याचा संकल्प पहिल्या दिवशीच सोडावा.

## का करावे ?

देवीचा उत्सव करण्यामागे भूमिका अशी आहे की, तीला संतुष्ट करून आपल्या घरातील सर्वांना वर्षभर सुख, शांती, समृध्दी प्राप्त व्हावी.

नवरात्र व गौरीपूजा ह्याच्यामध्ये काही सामायिक दिवस येतात. उदा. चैत्र शुध्द तृतीया ते चैत्र शुध्द नवमी हे सामायिक दिवस असून, त्या दिवसांची माहिती चैत्र गौरी पूजन ह्या पुढील पाठात आहे.

चैत्र शुध्द प्रतिपदेपासून वसंत ऋतू चालू होतो. वातावरणातील उष्णता वाढते म्हणून मुख्यतः खेडेगावी ह्या दिवसापासून पाणपोई टाकण्याची पध्दत आहे.



# ३. चैत्र गौरी पूजन

ज्याप्रमाणे चैत्र शुध्द प्रतिपदेला चैत्री नवरात्र बसते, त्याचप्रमाणे चैत्र शुध्द तृतीयेला चैत्र गौरी पूजनाला सुरवात होते. चैत्री गौरी पूजनाचा काळ चैत्र शुध्द तृतीयेला ते वैशाखातील अक्षय्यतृतीयेपर्यंत असतो. इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे सर्वसाधारणपणे हे पूजन एप्रिल महिन्यात येते.

## काय करावे ?

गौरी पूजनात घरात असलेल्या अन्नपूर्णेची षोडषोपचारे पूजा करून, फुलाने वगैरे अलंकृत केलेल्या पाळण्यामध्ये तिला वस्त्रालंकार घालून तिची स्थापना करावी. ह्यापुढील एक महिना अन्नपूर्णेचे वास्तव्य ह्या पाळण्याम ध्येच रहाते. देवीला तिच्या स्थानावरून हलवायची नसते. परंतु रोज तिची पूजा सुवासिनी स्त्रियांनी करणे आवश्यक आहे. ह्यासाठी तिला वाहिलेल्या फुलांचे निर्माल्य काढुन, सुगंधीत जल फुलांनी तिच्यावर शिंपडावे. तसेच गंध, पुष्प वहावे. प्रथम दिवशी अन्नपूर्णेची पूजा झाल्यावर आंब्याची डाळ व आंब्यांचे पन्हे ह्यांचाच नैवेद्य दाखववावा. असाच नैवेद्य रोज एका सुवासिनीला बोलावून दाखवावा, पण ते शक्य न झाल्यास, देवी बसलेली असलेल्या काळात कोणत्याही दिवशी १० ते १२ सुवासिनींना आमंत्रित करावे. ओल्या हरभऱ्यांनी त्यांची ओटी भरून त्यांचा सन्मान करावा. तसेच आब्याची डाळ व आंब्याचे पन्हे देऊन सुवासिनींना संतुष्ट करावे. (दक्षिणा मात्र देऊ नये.) आंब्याची डाळ व आंब्याचे पन्हे देण्यामागे वैज्ञानिक कारण असे आहे की, चैत्र मासा-पासून हवामानामध्ये उष्णता जाणविण्यास सुरवात होते; व म्हणूनच काट्याने काटा काढल्याप्रमाणे आंबा आणि हरभऱ्याच्या डाळीच्या उष्णतेने उष्णता मारली जाऊन शरीरास शांत वाटते. ह्या समारंभासच 'चैत्रगौरीचे हळदीकुंकू' असे म्हणतात. अन्नपूर्णेची रोज पूजा करताना मोगऱ्याचा अथवा चाफ्याचा गजरा घालावा. ह्या दोन्ही फुलांच्या वासाने शरीरातील उष्णता कमी होते, हा सुध्दा साधकाला होणारा फायदाच आहे.

सभोवतालचे वातावरण प्रसन्न आणि शुध्द होण्यासाठी सुध्दा ह्या फुलांचा उपयोग होतो. अक्षय्य तृतीयेला अन्नपूर्णेला झोपाळ्यातून काढून,

पंचामृताने स्नान घालून तिची स्थापना इतर देवांबरोबर केली जाते.

## फलप्राप्ती

चैत्र गौरी पूजन मनोभावे केल्याने अपरंपार कौटुंबिक सौख्य प्राप्त होते. सौभाग्य, धन-धान्य, पुत्रपौत्रादी व सर्व प्रकारची समृध्दी मिळवण्यासाठी सुवासिनींनी हे पूजन जरूर करावे. त्यासाठी फारसे श्रम, वेळ अथवा द्रव्य लागत नाही, हे वाचकांच्या लक्षात आले असेलच.



# ४. रामनवमी

जेव्हा-जेव्हा पृथ्वीवर अधर्म थैमान घालतो, तेव्हा-तेव्हा दुष्टांचे पारिपत्य करण्यासाठी श्री विष्णु स्वतः पृथ्वीवर अवतरतात. श्री विष्णुंच्या दहा अवतारांपैकी एक अवतार म्हणजे रघुकुलोत्पन्न श्री रामचंद्र हे होत. त्यांचा जन्म ज्या दिवशी झाला, तोच रामनवमी सोहळा होय.



वाचकांनी हे लक्षात घ्यावे की श्री विष्णुंचा एक अवतार शिल्लक असून तो 'कलंकी' या नावाने योग्य काळी पृथ्वीवर अवतीर्ण होणार आहे. ज्या दिवशी कलंकी अवतार घेतला जाईल, तो दिवस शुध्द षष्ठी असेल, असे पुराणात सांगितले आहे. जन्मकाल सायंकाळी असेल.

## केव्हा ?

रामनवमी म्हणजेच राम जन्म सोहळा चैत्र शुध्द नवमी या दिवशी होतो. इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे मार्च महिन्याअखेर अथवा एप्रिल महिन्याच्या सुरवातीला हा सण येतो.

## काय करतात ?

रामजन्म सोहळा हा सर्वसाधारणपणे रामाच्या देवळात साजरा केला जातो. एक पाळणा हार-फुले इत्यादींनी सजवून ठेवतात. रामनवमीला

## ५. हनुमान जयंती

संपूर्ण भारत वर्षात, विशेष करून, महाराष्ट्र, गुजरात, मध्य प्रदेश, उत्तर भारत, बिहार आणि संपूर्ण काशीखंड येथे अत्यंत भक्तिभावाने उपासना केले जाणारे एक प्रमुख दैवत म्हणजेच श्री हनुमान होय. शक्ती, भक्ती, युक्ती, ज्ञान, सेवाभाव हे ज्याच्यामध्ये एकवटले आहेत, असे हे एकमेव दैवत आहे. प्रत्यक्ष शनीदेव सुध्दा ज्याला वचकून आहेत, असा हा पराक्रमी व अखंड ब्रम्हचारी देव. त्याचा जन्मदिवस म्हणजेच हनुमान जयंती सर्वत्र उत्साहाने साजरी केली जाते.



### केव्हा ?

चैत्र शुध्द पौर्णिमेला हा उत्सव असतो व इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे सर्वसाधारणपणे एप्रिल महिन्यामध्ये येतो. ही पौर्णिमा सूर्योदयव्यापीनी असते. म्हणजेच सूर्योदयाचे वेळेस पौर्णिमेचे अस्तित्व असावयास लागते. याचे कारण म्हणजे जन्म होताच, हनुमानाच्या उत्पत्ती काळीच, तो सूर्याला फळ समजून त्याच्यावर झेपावतो, हे आहे.

## काय करावे ?

चैत्र शुध्द पौर्णिमेला ब्राम्हमुहूर्तापासून म्हणजेच पहाटे साडेचार वाजल्यापासून मारूती मंदिरामध्ये हा उत्सव साजरा करण्याची प्रथा आहे. प्रवचनकार प्रवचन रूपाने अथवा किर्तनकार किर्तन रूपाने मारूती जन्माची कथा सांगतात. सूर्योदयाला किर्तन संपवून मारूतीचा जन्मोत्सव साजरा करतात.

मारूतीला तीळाच्या तेलाचा अभिषेक करून, रूईच्या पानांच्या माळा घालतात. उपस्थित भक्तगणांना सुंठवडा, खोबरे व साखर ह्याचा प्रसाद दिला जातो. हनुमानाला हरभरा प्रिय आहे व म्हणूनच दुपारी दाखविण्याच्या महानैवेद्यात भाजणीचा वडा असावयास लागतो. किंबहुना कच्च्या भाजणीच्या वड्याचा नैवेद्य सुध्दा चालतो. संपूर्ण दिवसभर भजने वगैरे धार्मिक कार्यक्रम चालूच रहातात.

ज्यांचे कुलदैवत हनुमान आहे, त्यांच्या घरी हनुमान जयंती उत्साहाने साजरी केली जाते. सर्वसाधारणपणे रुद्र करून, हनुमानाला अभिषेक करून, पंचोपचाराने पूजा केली जाते. हनुमानास अशोकाचे फूल तसेच दवणा हे प्रिय आहेत. (पौर्णिमेला दवणा वहावा, अशी वहिवाटपण आहेच) हनुमान हा शिवस्वरुप असल्यामुळे अभिषेकापूर्वी रुद्र सांगितला जातो. हनुमान ज्याचे कुलदैवत आहे. त्यांचे घरी पाषाणाची मूर्ती असते. तिला शेंदूर तेलामध्ये कालवून त्याचे लेपन करतात. मंदिराप्रमाणेच नैवेद्य व महानैवेद्य दाखविला जातो.

## हनुमानदर्शनाविषयी कथा

हनुमानाचे दर्शन करावयाची एक विशिष्ट पध्दत नमूद करण्यासारखी आहे. त्याचे दर्शन घेताना सर्वप्रथम त्याच्या डाव्या पायावर दृष्टी टाकल्यास भक्तांचे संकट निवारण तो त्वरीत करतो, अशी श्रध्दा आहे व त्या विषयीची कथा अशी -

अहीरावण व महीरावण या असुरांनी देवीला बळी देण्यासाठी राम व लक्ष्मण यांना कैद केले. ज्या देवळात त्यांना बळी देणार होते त्या जागेविषयीचे ज्ञान हनुमानास झाले. ब्रह्मदेवाने दिलेल्या वरामुळेच हनुमानास लहान-मोठे



रुप धारण करण्याची शक्ती प्राप्त होती. त्याप्रमाणे सूक्ष्म रूप धारण करून, हनुमान देवीच्या मागे जाऊन बसले. सर्व प्रथम हनुमानाने देवीचा विरोध मोडून काढला. त्यानंतर अहीरावण व महीरावण यांना देवळाच्या गाभाऱ्यात पाचारण करून त्यांचा वध केला. नंतर रामचंद्र व लक्ष्मण यांना पाठविण्याची राक्षसांना विनंती केली. ते आत येताच, रामाला उजव्या खांद्यावर व लक्ष्मणाला डाव्या खांद्यावर बसवून व डावा पाय पुढे टाकून मारूतीने उड्डाण केले. उजव्या खांद्यावर बसलेल्या रामाची नजर हनुमानाच्या डाव्या पायावर प्रथम पडली व रामाने त्याला वर दिला की, जो कोणी तुझ्या डाव्या पायाचे दर्शन घेईल, त्यांचे संकट निवारण होईल.

## फलप्राप्ती

विद्वान, शक्तीशाली, महापराक्रमी, सेवाधर्मी अशा हनुमानाचे पूजन केल्यास, तेच गुण भक्तास प्राप्त होऊ शकतात. संकटग्रस्त भक्तांनी, संकट मुक्त होण्यासाठी रात्री ११.३० ते १२.३० या वेळेस हनुमानचालीसा किंवा रामदासस्वामीरचित हनुमानस्तोत्र अकरा दिवस अकरा वेळा म्हणावे. रामदास स्वामींनी सुध्दा शक्ती प्राप्त व्हावी, म्हणून अकरा मारूतींची स्थापना केली, हे लक्षात घेण्यासारखे आहे.

## ६. अक्षय्य तृतीया

वास्तविक पहाता, अक्षय्य तृतीया हा सण नव्हे; पण अतिशय दुर्लभ असा हा मुहूर्त असल्याने, त्याची गणना सणांमध्ये केली आहे.

अक्षय्य तृतीया म्हणजेच वैशाख शुक्ल तृतीया होय. सर्वसाधारणपणे इंग्रजी दिनदर्शिकेप्रमाणे एप्रिल महिन्यात हा मुहूर्त येतो.

अक्षय्य तृतीया ही वैशाख शुध्द तृतीयेच्या दिवशी सूर्योदयापासून पुढील दोन प्रहारापर्यंत म्हणजेच सूर्योदय साडेसहाला असल्यास, अक्षय्य तृतीया साडेबारापर्यंत असते. वर्षात येणाऱ्या साडेतीन मुहूर्तांपैकी अक्षय्य तृतीया हा अर्धा मुहूर्त जरी साडेबारापर्यंत असला, तरी परशुरामाचा जन्म सुध्दा ह्याच दिवशी झाल्यामुळे संपूर्ण दिवस शुभ मानला जातो. स्थावर जंगमाचे व्यवहार करण्यासाठी, नूतन दागदागिने अथवा वस्त्रे घेण्यासाठी हा योग शुभ समजावा.

### काय करतात ?

वैशाख महिना सुरू झाल्यापासून ते विशेषतः शुध्द तृतीयेपासून, हवेत उष्णता जास्त जाणवण्यास सुरवात होते, म्हणून ह्या दिवशी ब्राह्मणास अथवा सत्पात्री जलकुंभ दान करावे. तृषार्तांची तहान भागविण्यास जागोजागी पाण-पोई उभ्या केल्या जातात. जलदान श्रेष्ठ असून तहानलेल्याला पाणी दिल्याने दात्यास आशिर्वाद प्राप्त होतात. हे दान ब्राह्मणास केल्यास जलकुंभाबरोबर वाळ्याचा पंखा, छत्री तसेच जोडे देऊन त्याचे आशिर्वाद घ्यावेत.

अक्षय्य तृतीयेला पितरांचे तीलतर्पण करून, श्राध्द केल्यास पितरांची कृपादृष्टी दोन हजार वर्षापर्यंत रहाते. तीलतर्पण करणे म्हणजेच फुलपात्रामध्ये पाणी घेऊन, त्यात काळे तीळ टाकून त्यातील पाणी पळीने घेऊन अंगठ्यावरून ताम्हणामध्ये सोडावे. पाणी सोडताना म्हणजेच तर्पण करताना पितरांची नावे घ्यावीत. अंगठ्यावरून पाणी सोडण्यामागील भूमिका अशी आहे की, तर्जनी व अंगठा ह्याच्यामधील जागेत पितृतीर्थ आहे व म्हणून तिथून सोडलेले पाणी हे पितृतीर्थाचे पाणी असून, ते नैसर्गिकपणे अंगठ्यावरून जाते.

### फलप्राप्ती

अक्षय्य तृतीयेला केलेल्या दानाचा अथवा कुठल्याही कर्माचा क्षय होत नाही. त्यामुळे मिळणारे फळ हे अक्षय्य (कायम) स्वरूपाचे असते.



## ७. एकादशी - आषाढी-कार्तिकी

तसे पहाता, दर पंधरा दिवसाला एक, अशा वर्षातून चोवीस एकादशा येतात. परंतु प्रस्तुत पुस्तकात प्रामुख्याने फक्त आषाढी व कार्तिकी एकादशी विषयीच चर्चा केली आहे; कारण ह्या दोन एकादशा, सणांप्रमाणे उत्साहाने साजऱ्या केल्या जातात. आषाढी एकादशी म्हणजे आषाढ महिन्यातील शुक्ल पक्षातील एकादशी असून ती सर्वसाधारणपणे जुलै महिन्यात येते. कार्तिकी एकादशी कार्तिक महिन्याच्या शुक्ल पक्षातील असून ती सर्वसाधारणपणे नोव्हेंबरमध्ये येते.

आषाढी एकादशी ते कार्तिकी एकादशी ह्या काळाला 'चातुर्मास' असे म्हणतात. ह्या दिवसांमध्ये भगवान श्री विष्णु योगनिद्रेमध्ये गेले असल्यामुळे हा काळ विवाहास अयोग्य समजला जातो. श्री विष्णुंची योगनिद्रा आषाढी एकादशीपासून चालू होत असल्यामुळे तिला 'शयनी एकदशी' असे म्हणण्याचा सुध्दा प्रघात आहे. त्याचप्रमाणे कार्तिकी एकादशीला श्री विष्णु योगनिद्रेतून बाहेर येत असल्यामुळे तिला 'प्रबोधिनी एकादशी' असे पण संबोधतात.

शुध्द पक्षात म्हणजेच शुक्ल पक्षात येणाऱ्या एकादशींना देवाचे दर्शन त्याच्या स्थानी जाऊन घेणे, तर वद्य पक्षात येणाऱ्या एकादशींना संताच्या स्थानी जाऊन दर्शन घेणे, शास्त्रसंमत आहे. म्हणूनच आषाढी व कार्तिकी एकादशींना पंढरपूरला जाऊन श्री पांडुरंगाचे दर्शन घेण्याचा प्रघात आहे.

स्मार्त एकादशी उपोषण करून शिवउपासक साजरी करतात; तर भागवत एकादशी ही विष्णुउपासक करतात. श्री विठ्ठल हे श्री विष्णुचेच रूप आहे, म्हणून आषाढी व कार्तिकी ह्या एकादशींना पांडुरंगाची उपासना केली जाते. आषाढी एकादशीला श्रीकृष्णाने (श्री विष्णुने) विठ्ठलाचा अवतार घेऊन पंढरपूरला पुंडलिकाला दर्शन दिले, त्या निमित्ताने वारकऱ्यांची ह्या एकादशीवर विशेष श्रध्दा आहे.

आषाढी एकादशी ही केवळ श्री पांडुरंगाच्या प्रेमापोटी साजरी केली जाते. कार्तिकी एकादशी मनोकामना पूर्ण होण्यास तसेच विवाह ठरण्यामध्ये अडचणी येत असल्यास त्या दूर करण्यासाठी करतात.

चोवीस एकदशा मासानुक्रमे खालीलप्रमाणे

| | |
|---|---|
| चैत्र - | कामदा - मनोकामना पूर्ण करणारी |
| | वरुथिनी - वर देणारी |
| वैशाख - | मोहिनी - काम, क्रोध, मोहापासून मुक्त करणारी |
| | अपरा - जय मिळवून देणारी |
| ज्येष्ठ - | निर्जला - मोक्षदायिनी |
| | योगिनी - योगमायेतून सोडविणारी |
| आषाढ - | देवशयनी - विष्णु योगनिद्रेत असलेली |
| | कामिका - मनोरथ पूर्ण करणारी |
| श्रावण - | पुत्रदा - संतान देणारी |
| | अजा - पुनर्जन्मापासून मुक्ती देणारी |
| भाद्रपद - | परिवर्तिनी - इष्ट बदल घडविणारी |
| | इंदिरा - लक्ष्मी सिध्दीसाठी |
| अश्विन - | पापांकुशा - पाशमुक्ती |
| | रमा - स्त्रीचे सौभाग्य वाढविणारी |
| कार्तिक - | देवप्रबोधिनी - देवाचे उत्थापन करणारी |
| | उत्पत्ती - वंशवृध्दी करणारी |
| मार्गशीर्ष - | मोक्षदा - मोक्षासाठी |
| | सफला इष्ट फल देणारी |
| पौष - | पुत्रदा - पुत्र देणारी |
| | षट्‌तिला - रोगनाशक |
| माघ - | जया - यशदायी |
| | विजया -जय देणारी |
| फाल्गुन - | आमलकी - आरोग्य देणारी |
| | पापमोचनी - पापसंहारक |

दर तीन वर्षांनी अधिक मास येतो, तेव्हा अर्थातच त्या वर्षी सव्वीस एकादशा असतात. अधिक मासातील शुध्द पक्षात येणारी एकादशी मनोकामना पूर्ण करते, म्हणून तिला 'कमला एकादशी' असे म्हणतात.



## ८. नागपंचमी

श्रावण महिना म्हणजे सणांचा व निरनिराळ्या उत्सवांचा महिना. त्या सणांमधील पहिला सण म्हणजे नागपंचमी. नागपंचमी हा सण, उत्सव व व्रत ह्या तीनही प्रकारात मोडतो. श्रावण शुध्द पंचमीचा दिवस हा नागपंचमीचा सण असून सर्वसाधारणपणे जुलै-ऑगस्टमध्ये येतो.

### पूर्वपिठीका

औद्योगिकदृष्ट्या भारत कितीही प्रगत देश झाला, तरी प्राचीन काळापासून आजतागायत हा देश शेतीप्रधानच राहिला आहे. शेतकऱ्यांचे पाऊस-पाणी जरी उत्तम झाले. अन्नधान्य अप्रतिम उगवले, तरी आलेल्या पिकांना उंदीर व घुशी यांच्यापासून कायम भय असते. ह्या उंदीर-घुशींचा फडशा पाडण्याचे काम साप व नाग करतात. ''आपल्या शत्रुचा शत्रू हा आपला मित्र असतो,'' ह्या न्यायाने नाग व साप शेतकऱ्यांचे मित्र आहेत. अशा ह्या नागांचा वर्षातून एक दिवस मानसन्मान करावा, ह्या दृष्टीने नागपंचमी ह्या सणाचा जन्म झाला.

नाग व साप हे जरी शेतकऱ्यांचे मित्र असले तरी विषारी असणे, हा त्यांचा अंगभूत गुणधर्म आहे. त्यांच्या मार्गात अभावितपणे सुध्दा आल्यास, ते दंश करणार, हे निश्चित आणि त्यामुळेच त्यांचा संहार केला जाणे हे सुध्दा नैसर्गिकच. परंतु ते शेतकऱ्यांवर करत असलेल्या उपकारांची जाण ठेवून, कमीत-कमी संवत्सरातील एक दिवस तरी त्यांची हत्या न करता उलट त्यांचे पूजन करावे, ह्या भावनेतून नागपंचमी साजरी केली जाते.

### काय करावे व काय करू नये ?

नागपंचमीचे दिवशी आपण नाग ही देवता समजून तिची पूजा करत असल्यामुळे चुकून सुध्दा आपल्या हातून नागाला इजा होणार नाही याची काळजी घेणे आवश्यक असल्यामुळे भक्तांनी काही गोष्टी करू नयेत. उदा. नागपंचमीला भाज्या, फळे इत्यादी कापू नयेत, कारण कापणे किंवा ज्या योगे अनवधानानेसुध नागास इजा होईल, असे काहीही करू नये.

निरनिराळ्या ठिकाणी नागपंचमीचा उत्सव वेगवेगळ्या प्रकारे साजरा केला जातो. काही ठिकाणी मातीचा नाग करून त्याचे पूजन केले जाते. काही ठिकाणी भिंतीवर नाग काढून त्याची पूजा करतात तर काही ठिकाणी केशरयुक्त गंधाने नऊ नागांचे कुटुंब चितारले जाते. (कुटुंब म्हणजे नर-मादी व एक बालक. वास्तविक पहाता नाग कुटुंबवत्सल नाही, हे वाचकांनी लक्षात घ्यावे) काही ठिकाणी चित्रमय नागाची पूजा करतात. खेडेगावी स्त्रिया वारूळाची पूजा करतात. नागास साळीच्या लाह्या, जोंधळ्याच्या लाह्या, फुटाणे, दुर्वांचे तणावे, आघाडा हे वाहून त्यांचा सन्मान करतात. तसेच नाग ही देवता असल्यामुळे दुध-साखरेचा नैवेद्य दाखविला जातो. महानैवेद्यासाठी वरण-पुरण, उकडीचे मोदक, दिंड वगैरे करून माध्यान्नसमयी हा नैवेद्य दाखवितात. तिन्ही सांजा होण्याचे आधी नागांचे विसर्जन केले जाते.

## फलप्राप्ती

हा सण फलप्राप्तीसाठी करण्याचा नसून नागदेवतेचे आभार मानण्यासाठी आहे, परंतु नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे वंशवृध्दीसाठी नागयुग्माची पूजा करणे अथवा पितरांचा दोष असल्यास बारा ज्योतिर्लिंगाचे स्थानी नारायण नागबळी करणे, शास्त्रसंमत आहे. बारा ज्येतिर्लिंगाखेरीज गोकर्ण महाबळेश्वर अथवा हरिहेश्वर ही स्थाने सुध्दा या कार्यास योग्य आहेत.

विशेष सूचना - भक्तांनी हे लक्षात घ्यावे की, नाग दूध पीत नाही व त्या दृष्टीने रस्त्यावर बसलेल्या गारुड्यांकरवी नागाला दूध प्यायला लावणे म्हणजे नागावर अत्याचार करण्यासारखे असून, त्यामुळे पुण्य प्राप्त होण्याऐवजी पापाचे धनी होण्याची शक्यता जास्त आहे.





## ९. नारळी पौर्णिमा व रक्षाबंधन

वर्षानुवर्षे चालत आलेलया प्रथेनुसार ज्येष्ठ महिन्याचे आरंभापासून ते श्रावणाच्या पौर्णिमेपर्यंत मासेमारी बंद असते. ह्या काळात मासे प्रसवितात व त्यांची योग्य वाढ होऊन देण्यास अवधि मिळावा, म्हणून कोळी लोकांमध्ये या काळात मासेमारी निषिध्द मानली आहे. (मासेमारी धंद्यात कोळी लोकांखेरीज इतर लोक असल्यामुळे हा सारासार विचार हल्ली केला जात नाही व परिणामतः माशांची उपलब्धता कमी झाली आहे.) तसेच ज्येष्ठ महिन्यापासून श्रावणी पौर्णिमेपर्यंत, विशेषतः आषाढ व श्रावणाचे पहिले पंधरा दिवस, पाऊस मुसळधार पडतो व समुद्र त्या पाण्याला सामावून घेत असल्यामुळे खवळलेला असतो. नारळी पौर्णिमा म्हणजेच श्रावणातील पौर्णिमा. हा खवळलेला असतो. नारळी पौर्णिमा म्हणजेच श्रावणातील पौर्णिमा. हा दिवस कोळी समाजाचे दृष्टीने समुद्राला शांत करावयाचा दिवस होय.

इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे, सर्वसाधारणपणे ऑगस्टमध्ये हा सण येतो. मुख्यत्त्वेकरून हा सण जरी कोळी समाज साजरा करीत असला, तरी सर्वच लोक जलदेवतेची म्हणजेच वरूण राजाची पूजा करतात. त्या दिवशी समुद्राचे किनारी अथवा पाण्यात उभे राहून त्याची पंचोपचाराने म्हणजे गंध, अक्षता, पुष्प, हळद-कुंकू वाहून पूजा करतात व त्याला नारळ अर्पण करतात. (नारळ फोडत नाहीत.) व त्यास शांत होण्यासाठी प्रार्थना करतात. त्यानंतरच मासेमारी केली जाते. घरोघरी नारळीभातयुक्त संपूर्ण जेवणाचा नैवेद्य दाखवितात.

जल हे पंचमहाभूतांपैकी एक असल्याने, त्याचे समाधान करणे, त्याला शांत करणे, आवश्यक आहे. समुद्र शांत असणे, हे आरामदायी व सुखकारक जलप्रवासासाठी सुध्दा आवश्यक आहे.

नारळी पौर्णिमेचे महत्त्व हे अजून एका कारणाने आहे. ह्याच दिवशी बहिण भावाला राखी बांधून स्वतःच्या रक्षणाची जबाबदारी त्याच्यावर टाकते. या दिवशी बहिण भावाच्या घरी दुपारी भोजनास येऊन अपराण्ह काली (१२।। पर्यंत) किंवा प्रदोष काली म्हणजे तिन्हीसांजेच्या वेळी रक्षाबंधन करते. तेव्हाच ती आपल्या भावांना यमद्वितीयेचे अर्थात भाऊबीजेचे आमंत्रण देते.

## १०. श्रीकृष्ण जन्माष्टमी

श्रीकृष्णजन्माष्टमी हा दिवस जरी श्रीकृष्णाचा जन्म म्हणून साजरा करीत असले, तरी वास्तविक पहाता हा दिवस श्रीकृष्ण वर्धापनदिन आहे.

भगवान श्रीकृष्णाचा जन्म श्रावण वद्य अष्टमीला बुधवारी रोहिणी नक्षत्रावर, चंद्र वृषभ राशीला असताना झाला, म्हणून ज्या मध्यरात्रीला श्रावण वद्य अष्टमी येते (जरी दिवसा सप्तमी असली तरी सुध्दा) व रोहिणी नक्षत्र असते, ती रात्र कृष्ण जन्माची रात्र होय. हा दिवस सर्वसाधारणपणे पंधरा ऑगस्टच्या आसपास येतो.

कृष्ण जन्माष्टमीच्या उपवासाच्या दिवसाविषयी माधव हेमाद्री व कमलाकर ह्या अधिकारी व्यक्तिंनी भिन्न-भिन्न मते दिली आहेत. त्याचा सुवर्णमध्य काढावयाचा म्हणजे ज्या रात्री कृष्णाचा जन्म होणार असतो, त्या दिवशी सकाळपासून उपवास करून, त्याच्या दुसऱ्या दिवशी त्याचे पारणे करावे.



कृष्णजन्म कसा साजरा करावा, हे सांगण्याआधी श्रीकृष्णाने व त्याच्या सवंगड्यांनी मडक्यातील लोणी खाऊन चोरी केली, अशा तयार झालेल्या



प्रतिमेविषयी दोन शब्द. ज्या वेळेस ही घटना घडली, त्या वेळेस गोकुळामध्ये निघणारे दुध, दही, लोणी हे कंस बळजबरीने घेत असे. म्हणजेच एकाप्रकारे अपप्रवृत्तींना खतपाणी घालण्याची कृती गोकुळवासियांकडून घडत होती. उलटपक्षी, कंसासारख्यांच्या दुष्ट प्रवृत्तींचा संहार करण्यासाठी गोकुळातील बालके दही, दुध खाऊन धष्टपुष्ट होणे आवश्यक होते. श्रीकृष्णाने लोणी चोरी करण्यामागचा उद्देश, ही गोष्ट लोकांच्या लक्षात आणून देणे, हाच होता. तसेच श्रीकृष्णाला सोळा हजार स्त्रिया होत्या, असा एक गैरसमज आहे. त्या मागची भावना समजून घेण्यास त्या वेळेच्या परिस्थितीत डोकावणे, आवश्यक आहे.

कंसाने अनेक राज्यातील, विविध जातीतील, देखण्या असणाऱ्या सोळा हजार कुमारिकांना भ्रष्ट केले. कंसाचा वध करून श्रीकृष्णाने त्यांना मुक्त तर केले, पण त्या अभागिनींच्या घरच्यांनी व इतर आप्तस्वकीयांनी त्यांचा स्वीकार करण्यास नकार दिला. तेव्हा त्या कुमारिका ''आम्ही यमुनेला देह समर्पण करतो'', असे कृष्णाला सांगावयास गेल्या. म्हणून त्यांना समाजापासून संरक्षण देण्यासाठी श्रीकृष्णाने मंगळसूत्र अर्पण केले. परंतु त्यांचा श्रीकृष्णाशी विवाह झालेला नसून श्रीकृष्णानेच त्यांचा विवाह यादव युवकांशी करून दिला, हे लक्षात ठेवणे जरूरीचे आहे.

श्रीकृष्णाने मंगळसूत्र देण्याची केलेली कृती ही त्या स्त्रियांचा विवाह होईपर्यंत, त्यांचा पालनकर्ता होण्यासाठी केलेली युक्ती आहे. ह्या दोन प्रसंगांतून वाचकांच्या एवढे लक्षात यावे की, श्रीकृष्णाने केलेली प्रत्येक कृती ही पूर्ण विचारपूर्वक व समाजातील अनिष्ट प्रकार टाळण्यासाठी असे. त्यांनी विवस्त्रावस्थेत स्नान करणाऱ्या कुमारिकांचे वस्त्रहरण करण्यामागे सुध्दा एक अनिष्ट प्रथा बंद पाडण्याचा हेतू होता. त्या काळी विवाहोत्सुक तरूणी, विवाह होण्यासाठी, विवस्त्रावस्थेत नदीत स्नान करीत असत. असे केल्याने विवाह होतात, हा गैरसमज दूर करण्यासाठीच कृष्णाने उचललेले ते एक पाऊल होते. जन्माष्टमीच्या पाठात ही माहिती देण्याचा उद्देश श्रीकृष्णाविषयी काही लोकांच्या मनात असलेले गैरसमज दूर करण्याचा आहे.

वर सांगितल्याप्रमाणे रात्री बारा वाजता कृष्ण जन्म साजरा करतात. मंगल वातावरणनिर्मितीसाठी जन्माच्या वेळेपूर्वी किर्तन, कथा, गायन, वादन,

भजन असे कार्यक्रम करतात. कृष्णाची मूर्ती सुवर्ण, चांदी, अन्य धातू, लाकूड अथवा मातीची असते. मूर्तीला पंचामृती स्नान घालून वस्त्रालंकाराने सुशोभित करून मूर्ती पाळण्यात ठेवली जाते. त्यानंतर श्रीकृष्णाची पुराणोक्त विधिने पूजा करतात. त्यावेळी देवकी, वसुदेव, बलदेव, नंद, यशोदा व लक्ष्मी यांचे पण ध्यान करावे. दही, पोहे, साखर याचा नैवेद्य कृष्णाला दाखवावा. हा सण साजरा करणाऱ्यास संतती, संपत्ती, स्वर्गप्राप्ती हे प्राप्त होतातच, पण त्यामुळे त्याचबरोबर प्रेम व श्रध्दा यांचा संदेश लोकांमध्ये जातो.

## दहीहंडी

ज्या रात्री श्रीकृष्णाचा जन्म होतो, त्याचा दुसरा दिवस कालाष्टमी म्हणून दहीहंडी फोडून साजरा केला जातो. हंडीमध्ये दही, दूध, गुळ, पोहे ठेवून ती फुलाफळांनी सुशोभित करतात व खरे पहाता लहान मुलांनी हंडी फोडणे अपेक्षित आहे. बाल संवगडी गोविंदाच्या नावाने ती हंडी फोडतात.

सध्या मात्र वेगवेगळे पक्ष राजकीय लाभ उठवण्यासाठी मोठमोठ्या रकमा लावून, अतिउंच हंड्या लावून ह्या सणामागील भावना नष्ट करीत आहेत. एकमेकाविषयी निस्सिम प्रेम, निर्भयता हे गुण अंगात बाणण्यासाठी हा सण योग्य पध्दतीनेच साजरा होणे आवश्यक आहे.



# ११. पोळा



अतिशय महत्त्वाचा असलेला हा सण शहरवासियांच्या मात्र खिजगणतीत नसतो. भारत देश शेतीप्रधान असल्याने, ह्या सणाचे खरे पहाता अनन्य साधारण महत्त्व असावयाला हवे. परंतु शेतकरी वर्ग सोडता, अन्य लोकांकडून हा सण साजरा केला जात नाही.

या सणामागची पूर्वपिठिका ही नैसर्गिक अशीच आहे. शेतकरी बैलाचा उपयोग शेतात राबण्यासाठी, गाडी ओढण्यासाठी, गोधननिर्मिती इत्यादीसाठी करत असतो. एकप्रकारे, शेतकऱ्यांचा बैल हा देवच आहे. पोळा हा सण श्रावण वद्य अमावस्येला बैलांचा विश्रांती दिन म्हणून साजरा करतात. सर्वसाधारणपणे इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे ऑगस्ट महिन्याच्या अखेरीस हा सण येतो.

ह्या सणाचे दिवशी बैलांना स्वच्छ पाण्याने स्नान घालतात. नंतर बैलांच्या पाठीवर अलंकृत अशी झूल घालतात. तसेच शिंगांना बेगड बांधून, रंगीत मण्यांच्या, घुंगरांच्या व लहान घंटेच्या माळा घालतात. त्यानंतर हळद, कुंकू, गंध, अक्षता व पुष्पमाला ह्यांनी बैलांचे पूजन करतात. त्याला ओवाळून, पुरणपोळीचा घास भरवून नैवेद्य दाखविला जातो व त्यानंतर शेतकरी स्वतः कुटुंबासह भोजन करतो.

पोळ्याच्या दिवशी शेतकरी चुकून सुध्दा बैलांना कामाला लावत नाहीत अथवा आसूड उगारत नाहीत. बैलाला उद्देशून अपशब्द बोलत नाहीत. सायंकाळी गावातील सर्व शेतकरी आपआपले बैल घेऊन, एखाद्या मैदानाच्या ठिकाणी एकत्र जमून वाजत-गाजत बैलांची मिरवणूक काढतात. शेवटी बैलांना त्यांच्या गोठ्यात आणून दाव्याला बांधले जाते. हा सण पेरणी झाल्यानंतर होत असल्याने, पुढील तीन महिने म्हणजेच दसऱ्यापर्यंत बैलांना विश्रांती असते.

शेतकरी नसलेल्यांनी अथवा शहरांमध्ये राहणाऱ्यांनीसुध्दा आपल्या अन्नदात्याचे (बैलांचे) ऋण मान्य करण्यासाठी पोळा सण साजरा करावा. त्यासाठी मृत्तिकेचे बैल व गाई यांचे पूजन करून, यशाशक्ती नैवेद्य दाखवावा. भारतीय परंपरेप्रमाणे कोणाचेही ऋण मान्य करणे हे थोरपणाचे लक्षण समजले जाते.

# १२. गणेश चतुर्थी

संपूर्ण भारतभर, विशेष करून, महाराष्ट्रामध्ये, अत्यंत उत्साहाने साजरा होणाऱ्या ह्या उत्सवाविषयी समाजामध्ये काही समज-गैरसमज आहेत, ते सर्वप्रथम दूर करणे आवश्यक आहे.

## केव्हा

भाद्रपद शुक्ल पक्षांतील विनायकी चतुर्थी ते अनंत चतुर्दशीपर्यंत दीड दिवसाचा, पाच दिवसांचा, गौरीबरोबर विसर्जित होणारा, सात दिवसांचा, एकादशीचा अथवा अनंत चतुर्दशीला विसर्जन होणारा असे विविध दिवस गणपतीचा उत्सव साजरा केला जातो. सर्वसाधारणपणे हा उत्सव सप्टेंबर महिन्यात येतो.

परंतु वैदिक शास्त्राप्रमाणे गणपती उत्सव फक्त दीड दिवसाचाच असतो. शास्त्राप्रमाणे गणपतीची पार्थिव मूर्ती म्हणजेच काळ्या चिकणमातीची मूर्ती आकाराने हाताच्या अंगठ्यापासून वितीपर्यंत उंच असावी. मूर्ती मृत्तिकेची असल्यामुळे न भंगता ती फार दिवस टिकणे केवळ अशक्यच आहे. सर्वसाधारणपणे दीड दिवसापर्यंत मूर्ती भंग होण्याची शक्यता नसते आणि म्हणूनच गणेश उत्सव हा दीड दिवसच असावयाला हवा.

ह्या ठिकाणी हे पण नमूद करणे आवश्यक आहे की, पूर्वी मूर्ती लहान असे. एवढेच नव्हे तर, तिच्यावर फक्त हळद, कुंकू आणि वनस्पतींपासून निर्माण केलेले रंग ह्यांचाच प्रयोग केला जात असे. परिणामतः ह्या मूर्तींच्या विसर्जनाने प्रदूषण होण्याची शक्यता फार कमी असे. त्याचप्रमाणे गणपती विसर्जन पाण्यात करणे याला सुध्दा शास्त्राचा आधार नाही.

प्राणप्रतिष्ठा केलेल्या मूर्तीवर उत्तरपूजेच्या (विसर्जनाच्या) अक्षता टाकल्यावर मूर्तीतील देवत्त्व नष्ट होऊन ती मूर्ती केवळ मृतिका असल्यासारखेच आहे. मातीत माती मिसळून जावी ह्या उद्देशाने मूर्ती विसर्जन शेतात अथवा वहात्या पाण्यात करावे. विहिरीमध्ये विसर्जन करणे शक्यतो टाळावे कारण त्यामुळे विहिरींचे झरे बंद होण्याचा धोका तर संभवतोच पण त्याचबरोबर मूर्तींना लावलेल्या विविध केमिकल्सच्या रंगाने पाणी दूषित होते. तीच गोष्ट



तलावांच्या बाबतीतपण आहे. शास्त्रीय संकेत बाजूला ठेवल्यास गणपती उत्सवाचे स्वरुप खालीलप्रमाणे असून त्यात सार्वजनिक उत्सवाचा अंतर्भाव नाही.

## गणपती कसा व कशाप्रकारे आणावा ?

वर उल्लेख केल्याप्रमाणे श्रींची मूर्ती ही वास्तविक पहाता एक वीतेपेक्षा मोठी नसावी. परंतु सध्याच्या काळात ही गोष्ट मान्य करणे जरा कठीणच दिसते. तरीसुध्दा कमीत-कमी मूर्ती पोकळ नसावी ही दक्षता घ्यावी कारण पोकळ मूर्तीत प्राणप्रतिष्ठा होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे गणेश चतुर्थी हा गणेश जन्माचा दिवस आहे म्हणजेच गणेशाची मूर्ती ही बालस्वरूपच असते म्हणून मूर्ती कितीही मोठी असली तरी गणेशाच्या चेहऱ्यावरचे भाव हे निरागस बालकाचेच असावेत.

मूर्तिकाराकडून मूर्ती घरी आणताना नादमधुर अशा वाद्यांचाच उपयोग करावा. (उदा. झांजा, वीणा, परववाज वगैरे) कुठल्याही परिस्थितीत कर्कश आवाजांची वाद्ये वाजवू नयेत. श्रींची मूर्ती आणताना तिचा चेहरा कुणाचीही नजर लागू नये म्हणून वस्त्राने झाकावा. मूर्ती सर्वसाधारणपणे डाव्या सोडेंची असावी. उजव्या सोंडेचा गणपती आणल्यास प्राणप्रतिष्ठेपासून विसर्जनापर्यंत कडक सोवळे पाळावे लागते.

गणपतीची प्राणप्रतिष्ठा शक्यतो सर्वसाधारणपणे पहाटे पाच ते सूर्योदयापूर्वी म्हणजेच अरुणोदय ते सूर्योदयापूर्वी सूर्यादय काळी करावी, असा संकेत असल्याने गणपतीची मूर्ती आदल्या दिवशी आणून ठेवण्याची प्रथा पडत चालली आहे. गुरुर्जीच्या कार्यबाहुल्यामुळे व त्यांच्या उपलब्धतेची कमतरता असल्यामुळे सुध्दा गणपतीची मूर्ती आदल्या दिवशी आणतात.

## पूजा कशी करावी ?

गणेशाची प्राणप्रतिष्ठा गुरुजींच्या हस्ते करण्याचा प्रघात आहे, परंतु हे बंधनकारक नसून ज्या व्यक्तींनी गुरुमुखातून संथा घेतलेली आहे, त्यांनी स्वतः प्राणप्रतिष्ठा करावयास प्रत्यवाय नाही. पूजेची तयारी अशी! (इथे लिहिलेले साहित्य पंचामृती पूजेसे लागते) हळद, कुंकू, गंध, शेंदूर, अबीर, गुलाल, अक्षता, जास्वंद, मंदार अथवा इतर तांबडी फुले, दुर्वा, शमी, केवडा,

तुळस (फक्त गणेश चतुर्थीलाच गणपतीला वाहतात.) बेल व नानाविध पत्री, श्रीफळ, विड्याची पाने, सुपाऱ्या, जानवी-जोड, गुळ-खोबरं, उदबत्ती, निरांजन, कापूर, स्नानासाठी पंचामृत (दुध, दही, तूप, मध, साखर) अत्तर, गरम पाणी, नैवेद्यासाठी पेढे व उकडीच्या मोदकासह महानैवेद्य.

साहित्याची व्यवस्था केल्यानंतर पुढील कार्य गुरुजी शास्त्राप्रमाणे यजमानांकडून करवून घेतात; पण पूजेला बसण्याआधी यजमानांनी काही दक्षता घेणे आवश्यक आहे. उदा. सोवळे नेसून व खांद्यावर उपरणे अथवा शाल पांघरून, कुंकूम तिलक लावून मगच पूजेसाठी स्थानापन्न व्हावे. त्याआधी घरातील देवांची पूजा झालेली असावी. कुलस्वामिनी व कुलदेवतेस नारळ-विडा ठेवून आई-वडिलांना नमस्कार करून (हयात अथवा दिवंगत पूजेस आरंभ करावा. ह्यानंतर अर्थातच गुरुजींच्या आधिपत्याखाली पूजन करावे.



## आता गणपतीच्या नैवेद्याविषयी विशेष गोष्ट

सर्वसाधारणपणे बहुतांश लोकांकडे डाव्या सोंडेचा गणपती आणतात व ते योग्यच आहे. जर गणपती डाव्या सोंडेचा असेल तर त्याला सुके खोबरे व गुळ हे प्रिय आहे, हे लक्षात घेऊन त्याचा नैवेद्य दाखवावा. तसेच गुळ- नारळमिश्रित अथवा खव्याचे तळलेले मोदक ह्याचा पण नैवेद्य दाखवावा. जर गणपती उजव्या सोंडेचा असेल, तर खरवडलेल्या ओल्या नारळाचा



किस व गुळ ह्याचा नैवेद्य दाखवावा. तसेच उकडीच्या मोदकांचा सुध्दा नैवेद्य दाखवावा. परंपरेने मात्र सर्वजण दोन्ही प्रकारच्या गणपतींना उकडीच्या म ोदकांचाच नैवेद्य दाखवतात.

थोडे विषयांतर करून असे सांगावेसे वाटते की, मनोभावे संकष्टी करणाऱ्या भाविकांनी कदापिही चंद्रोदयापूर्वी उपवास सोडू नये. तसे केल्यास संकष्टी व्रताचे फळ मिळत नाही. संकष्टी ही संकट निवारणासाठी करत असल्यामुळे फलप्राप्तीसाठी उपासकांनी ही काळजी घ्यावी. काही लोक फक्त मंगळवारी येणारी संकष्टीला म्हणजेच अंगारकी चतुर्थीला (जी वर्षातून दोन वेळाच येते) उपवास करतात. वास्तविक पहाता, उपवास केल्यास सर्वच संकष्टीचा करावा. विनायकी चतुर्थी ही गणपतीचा वरदहस्त कायम असावा म्हणून करतात; आणि म्हणूनच हा संपूर्ण दिवसाचा उपवास आहे.

गणेश चतुर्थी ह्या सणाविषयी माहिती देताना गौरीविषयी सुध्दा माहिती देण्याचा मोह होतो; पण तो कटाक्षाने टाळला आहे. शास्त्राप्रमाणे गौरीच्या उत्सवाचा व गणपती उत्सवाचा अर्थाअर्थी काहीही संबंध नाही. गौरीचा उत्सव हा स्वतंत्र उत्सव असून तो साजरा करण्याचा प्रथासुध्दा भिन्न-भिन्न आहेत.

गणेश चतुर्थीविषयी लिहिताना, लोकमान्य टिळकांनी आरंभ केलेल्या सार्वजनिक गणेशोत्सवाविषयी चार शब्द सांगावेसे वाटतात. गणेशमूर्ती ही प्रायः बालस्वरुप असल्यामुळे मूर्ती शक्यतो अवाढव्य नसावी. तसेच मूर्तीचे आगमन हे नादमधुर संगीतातच असावे. कर्कश्य वाद्यांचा वापर हा रणांगणात करावयाचा असतो, हे भाविकांनी लक्षात घ्यावे. त्याचप्रमाणे उत्सवासाठी निधी गोळा करताना बळजबरी करू नये. अलिकडे सजावट व रोषणाई पडदे लावून झाकली जाते. त्याचा परिणाम म्हणजे दर्शनासाठी लांबच-लांब रांगा लागण्यात होतो. परिणामतः ज्येष्ठ नागरिक तसेच लहान अपत्याला घेऊन येणाऱ्या स्त्रिया श्रींच्या दर्शनापासून वंचित रहातात. तसेच गणेशोत्सव मंडळांनी आलेल्या निधीचा विनियोग गरीब विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठी केल्यास लोकमान्य टिळकांनी चालू केलेल्या गणेश उत्सवाचे सार्थक तर होईलच तसेच विद्येचे दैवत असणारा गणेशसुध्दा आयोजकांवर संतुष्ट होईल.

## १३. शारदीय नवरात्रौत्सव

आश्विन शुध्द प्रतिपदेपासून नवमीपर्यंत साजरा होणाऱ्या नवरात्र उत्सवाची पूर्वपिठिका प्रथम जाणून घेऊ.

देवीची साडेतीन पीठे (गाद्या) आहेत. त्यांचा क्रमच लावावयाचा झाल्यास, सर्वप्रथम येते ती कोल्हापूरची अंबाबाई अर्थातच श्री महालक्ष्मी. ही देवी सात्विकतेचे द्योतक आहे व कोल्हापूरचे पीठ हे पूर्ण पीठ मानले जाते. त्यानंतर राजसपणाचे प्रतीक म्हणजेच तुळजापूरची भवानी. हे दुसरे पूर्ण पीठ होय. माहुरची महामाया रेणुका ही परशुरामाची माता तसेच जमदग्नींची पत्नी असून तिचे स्थान हे तिसरे पूर्ण पीठ आहे. नाशिकची (वणीची) सप्तश्रृंगी जगदंबा अथवा अंबाजोगाईची योगेश्वरी ह्यांना अर्धपीठ समजले जाते. कुलाचाराप्रमाणे ह्या दोन्ही देवीपैकी एका देवीला अर्धपीठ मानणारे लोक आहेत. देशामध्ये इतर ठिकाणी असलेल्या देवी ह्या साडेतीनपीठाच्या देवीचीच रुपे आहेत. नवरात्रामध्ये पूजन केल्या जाणाऱ्या देवींमध्ये त्यामुळेच भिन्नभिन्नता आढळते.

### देवी बसते म्हणजे काय ?

शुंभ-निशुंभ, मधु-कैटभ, चंड-मुंड, महिषासूर आदि असुरांचा संहार करण्यास देवीला घनघोर युध्द करावे लागले. निरनिराळ्या शक्तींचा प्रयोग केल्यावरच ह्या भयानक राक्षसांचा पाडाव होऊ शकला. त्यामुळे श्री विष्णु आदि देवांना देवीस विश्रांती देणे जरूरीचे आहे असे प्रकर्षाने वाटू लागले. नवखंडातील शत्रूंचा नाश केल्यावर आलेला शीण घालविण्यासाठी प्रत्येक खंडासाठी एक रात्र अशा एकूण नऊ रात्री देवीनी विश्रांती घ्यावी ह्या हेतूने श्रीविष्णुंनी देवीला स्थानापन्न व्हावे असे सांगितले. अशा प्रकारे स्थानापन्न झालेल्या देवीला 'देवी बसली' असे म्हणतात. संपूर्ण नवरात्रीच्या काळात देवीला स्थानभ्रष्ट करू नये, म्हणजेच तिच्या विश्रांतीला धक्का लावू नये, असा संकेत आहे.

### देवी बसविण्याच्या भिन्न-भिन्न पध्दती

नवरात्र हा जसा सण आहे तसेच ते व्रतसुध्दा आहे. कुलाचाराप्रमाणे,



जाती-जमातीप्रमाणे, प्रदेशाप्रमाणे वगैरे विभिन्न पध्दती यासंबंधी आचरणात आणल्या जातात. जातीनिहाय उहापोह करणे शक्य नाही पण काही ज्ञाती अवलंबित असलेल्या प्रथा येथे उद्धृत केल्या आहेत.

नवरात्र याचा शब्दशः अर्थ नऊ रात्री असा आहे. म्हणजेच देवी नऊ रात्री बसलेल्या (विश्राम घेत असलेल्या) असावयास हव्यात. हा अर्थ धरल्यास आश्विन शुध्द प्रतिपदेला बसलेली देवी ही दसऱ्याच्या दिवशीच उठविली गेली पाहिजे, परंतु कुलाचाराप्रमाणे काही ज्ञातीत नवमीची पुजा झाल्यावर देवीला उठविले जाते. त्याचप्रमाणे काही कुटुंबामध्ये फक्त कुलस्वामिनीची स्थापना करून तिला नऊ दिवस झेडुंच्या फुलांच्या माळा बांधल्या जातात. त्यांच्याकडे घटस्थापना आणि धान्याचे रोह लावण्याची प्रथा नसते. तसेच कुमारिका व सुवासिनी पूजन सुध्दा फक्त देवी बसता-उठता केले जाते. अखंड दीपप्रज्वलन मात्र असतेच असते. अशा मर्यादित स्वरूपात नवरात्र उत्सव काहीजणांकडे केला जातो.

ज्यांच्याकडे विस्तृत स्वरुपात नवरात्र साजरे केले जाते त्यांची सर्वसाधारण पध्दत अशी आहे की कुलस्वामिनीची स्थापना करून त्याचबरोबर घटस्थापना तसेच घटाभोवती माती पसरून त्यात सप्त धान्ये (सालासह भात, ज्वारी, बाजरी, गहू, कांग, जवस, चणे) पेरली जातात. कुलस्वामिनीचा टाक तसेच श्रीफळ ठेवलेला घट ह्यांच्यावर झेंडूची फुले, तिळाची फुले अथवा नागवेलीची पाने ह्यांच्या माळा नवरात्रीचे सर्व दिवस बांधल्या जातात. माळाच का ? एखादे पुष्प का नाही ? ह्याला तसा शास्त्रीय आधार काही नाही. फक्त टाक लहान असून एक-एक फूल जरी नऊ दिवस वाहिले तरी टाकाचे दर्शन होणार नाही म्हणून माळा बांधण्याची पध्दत अस्तित्वात आली असावी. तसेच ज्या विभागात जी फुले मुबलक त्या फुलांच्या माळा करण्याची पध्दत आली असावी. अखंड दीपप्रज्वलन हे सुध्दा आलेच.

नवरात्रीच्या व्रतामध्ये कुमारी पूजनाचे महत्त्व विशेष आहे. यथासांग नवरात्र साजरे करणाऱ्या कुटुंबामध्ये नवरात्रीचे सर्व दिवस कुमारिका व सुवासिनींचे पूजन केले जाते. तसेच अष्टमीला नऊ सुवासिनींची ओटी भरून विशेष हळदीकुंकू करण्याची प्रथा आहे. नवरात्रीमध्ये आपण करणार असू

त्याचा संकल्प गुरुजींकडून पूजा करताना सोडावा लागतो. नऊ दिवस कुमारिका पूजन केल्यास शास्त्राप्रमाणे पृथ्वीचे राज्य मिळते, तर फक्त देवी बसता-उठता कुमारिकेचे पूजन केल्यास भोग व मोक्षप्राप्ती होते.

श्री देवी महात्म्यात सांगितल्याप्रमाणे एक वर्षाच्या कन्येचे पूजन करू नये. कुमारिका दोन वर्षापासून ते दहा वर्षापर्यंतची असावी. कुमारिका निरोगी व स्वज्ञातीची असावी. दोन वर्षाच्या मुलीची कुमारी म्हणून पूजा करावी, तीन वर्षाच्या कन्येची त्रिमूर्ती म्हणून, चार वर्षाची कल्याणी, पाच वर्षाची रोहिणी, सहा वर्षाची काली, सात वर्षाची चंडिका, आठ वर्षाची शांभवी, नऊ वर्षाची दुर्गा आणि दहा वर्षाची सुभद्रा म्हणून पूजावी. घरातील कर्त्या माणसांनी उपवास करावेत. नवरात्राच्या नऊ दिवसांत श्रीदेवी महात्म्याचे वाचन करावे. ते शक्य नसल्यास, अष्टमीच्या दिवशी बारावा अध्याय वाचावा अथवा नवार्णवमंत्राचा १०८ वेळा होम करावा.

काही ज्ञातीमध्ये कुलदेवतेबरोबरच कुलस्वामींनासुध्दा पुष्पमाला घालण्याची पध्दत आहे. काही ज्ञातींमध्ये सप्तमीला घरातील कर्ती स्त्री डाळ-तांदुळाचा जोगवा पाच घरी मागून, तो शिजवून त्याचाच नैवेद्य देवीला दाखवते. देवीला वरण-पुरणाचा नैवेद्य नित्यनेमाने दाखवून चालतो, परंतु शास्त्राप्रमाणे कुमारीकेला दररोज नूतन वस्त्र देऊन तिचा सन्मान करावा व नैवेद्याच्या जेवणात खाली दिल्याप्रमाणे पदार्थ ठेवावेत. शक्या झाल्यास उत्तम फलप्राप्तीसाठी खाली दिलेले दिवस व त्याखाली दिलेल्या वारांची सांगड घालून नैवेद्य तयार करावा.

| नवरात्रीतील दिवस क्रमांक | नैवेद्यातील पदार्थ | अपेक्षित फलप्राप्ती |
|---|---|---|
| १ ला | तूप | निरोगीपणा |
| २ रा | साखर | दीर्घायुष्य |
| ३ रा | दूध | दुःखनाश |
| ४ था | अनारसे | विघ्ननाश |
| ५ वा | केळी | बुध्दीवृध्दी |



| नवरात्रीतील दिवस क्रमांक | नैवेद्यातील पदार्थ | अपेक्षित फलप्राप्ती |
|---|---|---|
| ६ वा | मध | तेजवृध्दी |
| ७ वा | गुळ | शोकनाश |
| ८ वा | नारळाचे पाणी | तापनाश |
| ९ वा | लाह्या | इहलोक सुख |

वारांप्रमाणे नैवेद्यातील पदार्थ व त्यामुळे होणारी फलप्राप्ती खालीलप्रमाणे आहे.

| वार | पदार्थ | फलप्राप्ती |
|---|---|---|
| रविवार | पायस (खीर) | सुखसमृध्दी |
| सोमवार | गाईचे दूध | प्रगल्भता |
| मंगळवार | केळी | सुबुध्दी |
| बुधवार | लोणी | स्वर्गलोक |
| गुरुवार | खडीसाखर | सुखप्राप्ती |
| शुक्रवार | सीताफळ (शीतलता देणारे फळ) | दुःखनाश |
| शनिवार | हरभऱ्याचा पदार्थ | नेत्रदोष नष्ट |

नवरात्रीचा २ रा दिवस बुधवारी आल्यास दुसरा दिवस म्हणून साखर व बुधवार म्हणून लोणी घ्यावे.

ज्या लोकांची देवी शत्रुंचे निर्दालन करून राज्य उपभोगणारी आहे, अशा देवींना अष्टमीला बळी लागतो. तसेच अष्टमीलाच घागर फुंकण्याची सुध्दा प्रथा आहे. ह्याच दिवशी काही ज्ञातींमध्ये लग्नापासून पाच वर्षे नवविवाहिता पुत्रप्राप्ती व ऐश्वर्यासाठी खड्यांच्या महालक्ष्मीची सुध्दा पूजा करतात.

हल्ली जर चार भाऊ वेगवेगळे रहात असतील तर एकाकडेच नवरात्र करतात, परंतु हे अयोग्य असून चारही भावांकडे स्वतंत्र नवरात्र होणे आवश्यक आहे.

सार्वजनिक नवरात्र हा प्रकार तर सर्वथा अयोग्य आहे. गुजरातमध्ये असलेल्या ह्या प्रथेचा तेथून महाराष्ट्रात आलेल्या समाजाने चालू केलेल्या ह्या उत्सवास समाजविघातक असे वळण मिळालेले आपणाला दिसेल. ओळीने नऊ रात्री अतीकर्कश वाद्यांच्या साथीने गरबा खेळून शांतता भंग करणे, कितपत योग्य आहे, याचा संबंधितांनी विचार करावा.

## पुरवणी

नवरात्रीत आपण ज्या दुर्गेची पूजा करतो तिची नवरात्रीच्या प्रत्येक दिवशी निरनिराळी रुपे असतात. अर्थातच देवीचे पूजन करताना तिची खालील नामरुपे लक्षात ठेवावीत.

प्रथमेस - शैलपुत्री
द्वितीयेस - ब्रह्मचारिणी
तृतीयेस - चंद्रघंटा
चतुर्थेस - कुष्मांडा
पंचमीस - स्कंदमाता
षष्ठीस - कात्यायनी
सप्तमीस - काळरात्री
अष्टमीस - महागौरी
नवमीस - सिध्ददात्री

नवरात्रीतील पंचमीस 'ललितापंचमी' म्हणतात व काही कुटुंबात तेव्हा उपांगललिता हे व्रत केले जाते. हे व्रत पुत्रपौत्रप्राप्ती, धनधान्य, समृध्दी, कौटुंबिक स्वास्थ्य ह्यासाठी कुटुंबप्रमुखाने करावयाचे आहे. ह्या व्रतासाठी पूर्ण रात्रभर असलेली पंचमी घ्यावी. ह्या व्रतात ललितादेवीला ४८ दुर्वांची एक जुडी ह्याप्रमाणे ४८ जुड्या वहाव्यात. ह्यासाठी पंचमीला ललितागौरीची स्थापना व दुसरे दिवशी विसर्जन करावे लागते.

नवरात्रीमध्येच येणाऱ्या सप्तमीस 'सरस्वतीशयन सप्तमी' असे म्हणतात. श्रीदेवी महात्म्यामध्ये सांगितल्याप्रमाणे सप्तमीपासून दशमी-पर्यंत पठण-पाठण, लेखन ह्या गोष्टी ह्या काळात बंद ठेवाव्यात कारण सरस्वतीने शयन केलेले असते. ह्या संदर्भात हे लक्षात घ्यावे की गुरुकुलात



शिकत असलेल्या शिष्यांसाठी हा उपदेश आहे. नित्यनेमाने करावयाच्या वाचन-लेखनाला हरकत नाही.

नवरात्री व्रत हे वास्तविक पहाता नऊ रात्रींचे व्रत आहे पण सध्याच्या वेगवान जगात ९ दिवस यथासांग पूजन करण्यास वेळ मिळणे सुध्दा नव्या पिढीला कठीण आहे. अशा परिस्थितीत, शास्त्रानेच सर्व पूजा वगैरे विधी नवमीला करण्याची सोय ठेवली आहे. त्याला 'एकदिवसीय नवरात्र' असे म्हणतात. ह्या एका दिवसातच नऊ दिवस होणारे सर्व कुलाचार पार पाडावे लागतात.

## १४. दसरा (विजयादशमी)

वर्षातील साडेतीन मुहुर्तांपैकी एक मुहूर्त म्हणजे दसरा होय. आश्विन शुध्द दशमीला येणारा दसरा हा इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे साधारणतः ऑक्टोबर मध्ये येतो.

जरी हा दिवस साडेतीन मुहुर्तातील एक असून बहुतेक शुभकार्यासाठी योग्य असला तरी विवाहासाठी तसेच मुंजीसाठी हा मुहूर्त चालत नाही. आषाढी एकादशीपासून तुलसीविवाहपर्यंतचा काळ विवाहास अयोग्य समजला जातो. तसेच व्रतबंधन उत्तरायणातच करावयाचे असते. ही दोन कार्ये सोडता इतर कोणत्याही शुभकार्यासाठी दसरा हा शुभमुहूर्त आहे.

विजयादशमी साजरी करण्याची कारणे व ती साजरी करण्याच्या प्रथा निरनिराळ्या ठिकाणी वेगवेगळ्या आढळतात. महाराष्ट्रामध्ये नवरात्रात बसलेली देवी दशमीला उत्थापन करून सीमोल्लंघन करते, त्याच्याप्रित्यर्थ दसरा साजरा केला जातो. तसेच ह्या दिवशी क्षत्रिय लढाईसाठी निघण्यापूर्वी अपराजिता ह्या देवीची तसेच शमीवृक्षाची आणि अश्मंतक (आपटावृक्ष) ह्या वृक्षाची पूजा करीत असत. ह्या दिवशी आपट्याच्या पानांच्या रूपाने सोने लुटण्याची प्रथा पडली. शमीची पाने दुर्मिळ असून काटेरी असतात तर आपट्यांची पाने सहजगत्या उपलबध असल्यामुळे प्रतिकात्मक सोने म्हणून आपट्याची पाने वाटण्याची प्रथा पडली आहे.

सीमोल्लंघन करणे ह्या प्रथेला सध्याच्या युगात काहीही अर्थ उरलेला नाही, परंतु आपट्यांची पाने वाटून सर्वांना शुभेच्छा देणे हे मात्र अजुनही कटाक्षाने लोक करतात. शस्त्रपूजन करणे ह्या परंपरेला सुध्दा पूर्वीच्या काळा इतका अर्थ आता राहिला नसला तरी सरस्वतीपूजन, ग्रंथपूजन, नाममात्र शस्त्रपूजन व यंत्रपूजन, वाहनपूजन अवश्य करावे.

ह्या संदर्भात सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे आपट्याची उरलेली पाने दुसऱ्या दिवशी कचऱ्यामध्ये न टाकता त्यांचे यथासांग विसर्जन करावे अथवा आपटा व शमीची पाने वाळवून त्यांचा धूर करावा. त्यायोगे अनिष्ट शक्तींचा नाश होऊन भरभराट होते. एखादे आपट्याचे पान सोन्याचा संग्रह करतो.

## १५. दिपावली

दिपावली अर्थात दिपोत्सव ह्या भारतभर अत्यंत उत्साहाने साजरा होणाऱ्या सणाचे प्रामुख्याने खालीलप्रमाणे सहा भाग पडतात.

१) वसुबारस (आश्विन वद्य द्वादशी)
२) धनत्रयोदशी (आश्विन वद्य त्रयोदशी)
३) नरकचतुर्दशी (आश्विन वद्य चतुर्दशी)
४) लक्ष्मीपूजन (आश्विन वद्य अमावास्या)
५) बलीप्रतिपदा (कार्तिक शुध्द प्रतिपदा)
६) भाऊबीज (कार्तिक शुध्द द्वितीया)

वरील प्रत्येक दिवसाचे महत्त्व, तिथीवार खाली विशद केले आहे.

### १) वसुबारस

दिपोत्सवाचा हा प्रथम दिवस. हा दिवस गुरूद्वादशी तसेच गोवत्स द्वादशी असा सुध्दा ओळखला जातो. ह्या दिवसापासून आरंभ झालेला दिपोत्सव त्रिपुरी पौर्णिमेपर्यंत आकाश कंदिल लावून साजरा करतात. (हल्ली मात्र अपुऱ्या माहितीमुळे बहुतेक जण दिवा, पणती तसेच आकाश कंदिल धनत्रयोदशी अथवा नरक चतुर्दशीपासून भाऊबीजेपर्यंत लावतात.)

वसुबारस ह्या दिवसाला गुरुद्वादशी म्हटले जाते. याचे कारण म्हणजे श्रीपाद श्रीवल्लभांच्या निजगमनाचा हा दिवस. त्यांच्या स्मरणार्थ भक्त दिपोत्सव साजरा करतात. ह्याच दिवशी धेनु व तिचे वासरू यांचे पूजन स्त्रिया करतात. ह्या मागे सुध्दा असणारी भूमिका अशी आहे की, पोळ्याला पुरुष बैलाचे पूजन करतात. तसेच पुत्र-पौत्र, धनधान्य, सुबत्ता, आनंद व शांती ह्यासाठी स्त्रिया सवत्स धेनुची पूजा करतात. धेनु व तिच्या बछड्याला उकडीचे वडे, उडदाचे वडे, भात, गोडधोड पदार्थ, आंबवण खाऊ घालतात. काही ठिकाणी गाईला ओवाळून तिची आरतीसुध्दा केली जाते. ह्याच दिवशी एकभुक्त रहाणाऱ्या स्त्रिया गाईचे दूध, दही, तूप इत्यादी खात नाहीत.

### २) धनत्रयोदशी

सर्व देवांनी केलेल्या समुद्र मंथनातून धनत्रयोदशीला जी



चौदा रत्ने बाहेर आली त्यातील एक रत्न धन्वंतरी हे होय. **धन्वंतरी हा विष्णुचा अवतार असून ही आरोग्य देवता आहे.** अर्थातच **धनत्रयोदशी ही वैद्यक व्यवसायात असणाऱ्या लोकांसाठी अतिशय महत्त्वाची आहे. ह्याच दिवशी** स्त्रिया सुध्दा अभ्यंगस्नान करतात. वैद्यकीय व्यवसाय करणाऱ्या लोकांखेरीज व्यापारी लोकसुध्दा तितक्याच भावभक्तीने लक्ष्मीची पूजा करतात. घरोघरी सुध्दा सायंकाळी लक्ष्मीची पूजा करण्याची पध्दत आहे. ह्या दिवशी जरी पूजा लक्ष्मीची होत असते तरी मुख्य उद्देश श्री विष्णुंचा म्हणजेच धन्वंतरीचा वास आरोग्यासाठी घरात असावा, हा असतो. **धणे-गुळाचा नैवेद्य** देवाला दाखवितात.

### ३) नरकचतुर्दशी

सर्वसामान्यांची दिवाळी ह्या दिवसापासून धुमधडाक्यात चालू होते. वास्तविक पहाता, दिवाळीचे सहाही दिवस अभ्यंगस्नान आवश्यक असते; पण वेळे अभावी दिवाळीचे पहिले दोन दिवस अभ्यंगस्नानाची प्रथा बंद पडली आहे.

नरक चतुर्ददशीच्या दिवशी नरकासुराचा वध करून परतलेल्या श्रीकृष्णाने नरकासुराला दिलेल्या वराप्रमाणे सर्वांनी मंगलस्नान करून दिपोत्सव साजरा करावा. त्या दिवशी जरी आबालवृध्द स्त्री-पुरुषांनी अभ्यंगस्नान करावयाचे असले, तरी स्त्रियांनी पुरुषांच्या अंगाला तेल लावून स्नान घालण्याची रूढी पडली आहे. स्नान करतानाच चिराटे फोडून नरकासुराचा प्रतिकात्मक वध केला जातो. त्याच्या वधाच्या आनंदाप्रित्यर्थ फटाके वाजविले जातात. पुरुषांना औक्षण करून मग फराळ केला जातो.

अभ्यंगस्नानाविषयी विशेष महत्त्व तीळाच्या तेलाचे आहे. तीळाचे तेल हे लक्ष्मीचे द्योतक आहे तर पाणी गंगेचे द्योतक आहे. ह्या दोघांचे मिश्रण म्हणजे अभ्यंगस्नान होय. जल आरोग्यदायी, जीवनदायी आहे, तर तेल लक्ष्मी स्वरुप आहे. लक्ष्मी चंचल राहू नये म्हणजेच स्थिर रहावी, यासाठी दिपावलीचे सर्व दिवस अभ्यंगस्नान केल्यास संपूर्ण संवत्सर आरोग्य व संपत्तीचा लाभ होतो.

## ४) लक्ष्मीकुबेरपूजन

अलक्ष्मी नाशासाठी (म्हणजेच अवदसेचे पारिपत्य करण्यासाठी) तसेच अखंड लक्ष्मीप्राप्तीसाठी ह्या अमावस्येच्या दिवशी लक्ष्मीपूजन करतात. अखंड लक्ष्मीप्राप्ती म्हणजे अष्ट लक्ष्मींची प्राप्ती. त्या अष्ट लक्ष्मी म्हणजे धनलक्ष्मी, लाभलक्ष्मी, किर्तीलक्ष्मी, रौप्य लक्ष्मी, सुवर्णलक्ष्मी, धान्यलक्ष्मी, विजयलक्ष्मी, गृहलक्ष्मी होय. हे पूजन प्रदोषकाळी (सूर्यास्तानंतर) होते कारण लक्ष्मीचा प्रवेश तिन्हीसांजेला होतो. सूर्यास्तानंतर, स्थिर लग्नावर, पूजा करण्याची पध्दत असल्यामुळे कधी-कधी पूजेचा मुहूर्त रात्री ८-९ नंतर सुध्दा येतो. लक्ष्मीपूजनात कुबेर पूजन सुध्दा असते, कारण कुबेर हा संपत्तीचा देव असून लक्ष्मीने दिलेल्या वरामुळे त्याची संपत्ती अक्षय्य आहे.

लक्ष्मीपूजनाला धान्य, रुपे, सुवर्ण ह्यांची पूजा अपेक्षित आहे, परंतु घरोघरी हल्ली सोने, दागदागिने व वहीपूजन करून साळीच्या लाह्यांचा नैवेद्य दाखवितात. ह्याच वेळी नवीन केरसुणीची सुध्दा पूजा करतात. लक्ष्मीचे स्वागत फटाक्यांच्या आवाजाने (आतषबाजीने) करतात. रात्री बारानंतर नव्या केरसुणीने घरातील कचरा झाडून तो वेशीबाहेर ठेवावा. ह्याचा प्रतिकात्मक अर्थ अवदसेला घरातून बाहेर काढण्याचा आहे. पारंपारिकरित्या हा केर जुन्या सुपात भरून, जुन्या केरसुणीसकट, सूप वाजवून टाकला जात असे. सूप वाजविण्याचा अर्थ अलक्ष्मीला निरोप देणे असा आहे. एखाद्या गोष्टीचे 'सूप वाजले' ह्या शब्दप्रयोगाची उत्पत्ती ह्यात आहे.

## ५) बलिप्रतिपदा

बलिप्रतिपदा हा साडेतीन मुहूर्तापैकी एक मुहूर्त असे महाराष्ट्रात, उर्वरित पश्चिम भारतात व दक्षिण भारतातील काही भागात मानले जातो. उत्तरेत मात्र बलिप्रतिपदा हा अर्धाच मुहूर्त समजला जातो. जरी हा दिवस मुहूर्ताचा असला, तरी विवाह व मुंज या कार्यांसाठी हा मुहूर्त योग्य असेलच, असे नाही.

बलिप्रतिपदा साजरी करण्यामागे एक कथा आहे. श्री विष्णुंचा चौथा अवतार म्हणजे वामन ! हा अवतार उन्मत झालेल्या बळीराजाला वठणीवर आणण्यासाठीच झाला होता. त्या काळच्या प्रथेप्रमाणे राजे-रजवाडे भिक्षुकांना



विशेषतः बटुंना विन्मुख पाठवत नसत. बळीराजा जरी क्रूर दानव असला, तरी दानशूर म्हणून प्रसिध्द होताच. म्हणून श्री विष्णूंनी बटुचे रुप घेऊन तीन पावले भूमी बळीकडे दान मागितली. बळीराजाने त्याला रुकार देताच पहिल्या पावलाने बटूने स्वर्ग व्यापला, दुसऱ्या पावलाने पृथ्वी व्यापल्यावर तिसरे पाऊल बळीराजाच्या डोक्यावर ठेवून त्याला पाताळात पाठविले. परंतु बळीराजा हा श्री विष्णुंचा भक्त असल्याने त्याने विष्णुंकडे वर मागितला की, ह्या दिवशी जे माझी पूजा करेल, त्यांना आपल्या चरणाशी स्थान द्यावे. श्री विष्णूंनी हे मान्य केल्यामुळे बलिप्रतिपदा साजरी करण्याची प्रथा पडली.

शहरांमध्ये बळीची पूजा करणे हे अभावांनेच आढळते. पण खेडेगावां मध्ये मात्र शेणाच्या बाहुल्या करून बळीचे पूजन संकल्प करून केले जाते. शहरांमधील लोकांना पूजा करणे शक्य नसल्यास खालील प्रार्थना करावी.

( बलिराज नमस्तुभ्यं विरोचन सुत प्रभो ।
दानवेन्द्र सुराराते पूजामे प्रतिगृह्यताम् ।। )

बळीची पूजा ही पुरुषांनी करावयाची असते. बलिप्रतिपदेला सायंकाळी पत्नी पतीला औक्षण करून आपल्या पतीचे आयुष्य वाढावे, म्हणून प्रार्थना करते. औक्षण करताना पत्नीने ज्याप्रमाणे सावित्रीने सत्यवानाचे आयुष्य यमा कडून वाढवून घेतले, तसेच आपल्या पतीचे आयुष्य वृध्दिंगत व्हावे, अशी यमाला प्रार्थना करावी.

बलिप्रतिपदेला द्यूत खेळण्याची जी परंपरा आहे, त्याविषयी आदित्य पुराणात स्पष्टीकरण आहे. ह्या दिवशी शंकर-पार्वती द्यूत खेळले व त्यामध्ये पार्वतीने शंकराचा सतत पराजय केला. पार्वतीच्या खेळावर प्रसन्न होऊन शंकराने पार्वतीला 'शक्तिशाली होशील' असा वर दिला. ह्या दिवशी द्यूतामध्ये जे घडते, तेच वर्षभर घडत रहाते अशी समजूत आहे.

बलिप्रतिपदेला अभ्यंगस्नान करणे आवश्यक आहे व ते न केल्यास नरकप्राप्ती होते, असे वसिष्ठांचे वचन आहे.

## ६) भाऊबीज

धर्मशास्त्राप्रमाणे दिपावली वसुबारसेपासून ते त्रिपुरी पौर्णिमेपर्यंत असली तरी सुध्दा लौकिक अर्थाने भाऊबीज हा दिवाळीचा अखेरचा दिवस

म्हणून साजरा केला जातो.

ज्याप्रमाणे रक्षाबंधनास बहिण भावाकडे जाते, त्याचप्रमाणे भाऊबीजेला भाऊ बहिणीकडे जातो. भाऊबीज हा दिवस यमद्वितीया असा सुध्दा ओळखला जातो; कारण ह्याच दिवशी यम यमीकडे जातो व यमी त्याला स्नान घालून मिष्टांन्नाचे भोजन देऊन ओवाळते.

"औक्षण करणे" ह्या कृतीमागे दोन उद्देश आहेत. एक म्हणजे भावाने बहिणीचे संरक्षण करावे व दुसरा उद्देश बहिण-भावांमधील प्रेम वृध्दिंगत व्हावे, असा आहे. भाऊबीजेला यम यमीकडे गेला असल्याने त्याचा दरबार भरत नाही; त्यामुळे ह्या दिवशी मृत्यु पावणाऱ्या कोणत्याही जीवास यमराज नसल्याने स्वर्गप्राप्ती होते असे गरुड पुराणात उल्लेखलेले आहे.





## १६. मकर संक्रांत

१४ जानेवारी म्हटले की मकर संक्रांत हे कुठल्याही हिंदूस सांगावे लागत नाही. वास्तविक पहाता संक्रात ही इंग्रजी महिन्याच्या १२ ते १४ जानेवारी मध्ये कधीही येऊ शकते. तसेच साधारण दोनशे वर्षांनी संक्रांत १५ जानेवारीस येते. संक्रांतीचा संबंध संक्रमणाशी आहे. सूर्य जेव्हा एका राशीतून दुसऱ्या राशीत प्रवेश करतो त्याला संक्रमण असे म्हणतात. राशी बारा असल्यामुळे अर्थातच हे संक्रमण १२ वेळा होते, म्हणजेच वर्षामध्ये खालिल प्रमाणे १२ संक्रांती असतात.

| | |
|---|---|
| प्रथम संक्रांत | मेष संक्रांत |
| दुसरी संक्रांत | वृषभ संक्रांत |
| तिसरी संक्रांत | मिथुन संक्रांत |
| चौथी संक्रांत | कर्क संक्रांत |
| पाचवी संक्रांत | सिंह संक्रांत |
| सहावी संक्रांत | कन्या संक्रांत |
| सातवी संक्रांत | तूळ संक्रांत |
| आठवी संक्रांत | वृश्चिक संक्रांत |
| नववी संक्रांत | धनू संक्रांत |
| दहावी संक्रांत | मकर संक्रांत |
| अकरावी संक्रांत | कुंभ संक्रांत |
| बारावी संक्रांत | मीन संक्रांत |

संक्राती बारा असून सुध्दा सण म्हणून साजरी केली जाणारी संक्रांत मात्र मकर संक्रांतच होय. ह्याच्या विषयी दोन स्पष्टीकरणे उपलब्ध आहेत. एक म्हणजे ध्रुव प्रदेशांत वर्षाची विभागणी सहा महिने रात्र व सहा महिने दिवस अशी आहे. सहा महिन्याची रात्र संपून दिवसाला प्रारंभ होणारा प्रथम दिवस म्हणजे मकर संक्रांत. सूर्य किरण पृथ्वीतलावर पडल्याने त्या दिवसापासून वातावरण उत्साही होते व त्या प्रित्यर्थ उत्तरायणाच्या पहिल्या दिवशी मकर संक्रांत साजरी केली जाते. दुसरे स्पष्टीकरण असे की कर्क संक्रांती पासून

(१४ जुलै पासून) ते मकर संक्रांती पर्यंत (१४ जानेवारी पर्यंत) शेतकरी शेतीची कामे करत राबत असतो. पावसाळ्यात दुषित हवामानामुळे रोगराई असते. हे सर्व वातावरण मकर संक्रांतीपासून बदलते म्हणून सूर्याची प्रार्थना करून शुध्द सूर्यप्रकाश मिळावा, मनातील अंधःकार नाहीसा व्हावा, म्हणून संक्रांत साजरी करतात.

पौष महिन्यांत येणाऱ्या ह्या सणाला जात पात आणि स्थळ याचे बंधन नाही. सर्व देशभर हा सण थोड्या फार फरकाने साजरा केला जातो. महाराष्ट्रामध्ये ह्या दिवशी तिळाचे तेल लावून अभ्यंग स्नान करतात. तिळाचे तेल लावण्यामागचा उद्देश थंडीमुळे फुटलेले अंग मृदु व्हावे हा आहे. मकर संक्रांतीच्या आदल्या दिवसाला भोगी म्हणतात. त्या दिवशी सुध्दा तिळाच्या तेलाने अभ्यंग स्नान करून पहाटे मुगाच्या डाळीची खिचडी खातात. ह्याच खिचडीचा सूर्याला नैवेद्य दाखवून पुढील भोगी पर्यंत आम्हाला भोग मुक्त ठेव अशी प्रार्थना सूर्याला करतात.

संक्रांत हा सण विशेषतः स्त्रीयांनी साजरा करावयाचा असतो. त्या निमित्ताने सुवासिनी काळे वस्त्र नेसून सूर्याला त्याच्यासारखा तेजःपुंज पुत्र देण्याची प्रार्थना करतात. तसंच पतीच्या वंशातील दोष दूर करून संसार सुखी ठेवण्याची विनंती करतात. हा उत्सव तसे पहाता संक्रांतीपासून रथ सप्तमी पर्यंत हळद-कुंकू लुटून साजरा केला जातो. सायंकाळी आप्तेष्ट, शेजारी पाजारी, स्नेही ह्यांना तिळगूळ देऊन गोड बोलण्याचे आवाहन केले जाते. तिळगुळच कां ? तर त्याचे उत्तर असे की तिळ हे स्नेहाचे द्योतक तर गुळ गोडी वर्धक आहे. ह्या दोघांचे मिश्रण देऊन स्नेहाचे अतूट आणि गोड संबंध रहावेत अशी इच्छा प्रगट केली जाते. तिळ हे उष्ण असून थंडीमध्ये त्याचे सेवन करणे आरोग्यकारक आहे.

नवविवाहित स्त्रीने काळ्या सुगडामध्ये ऊस, हरभरे, बोरे, पैसा, सुपारी, कापूस, गंध, अक्षता व फुले ठेवून, त्याचे पूजन करून त्याच्यावर दुसरे लाल सुगड झाकण ठेवून ते ब्राह्मणाला किंवा सुवासिनींना देण्याची प्रथा आहे. ह्या मागचे पण उद्देश दोन. एक म्हणजे सौभाग्य अखंड रहावे व दुसरे म्हणजे नवपरिणित वधूला दान देण्याची सवय लागावी.



आमच्यावर संक्रांत ओढवली आहे. संक्रांत येणे ही शब्द रचना वाईट अर्थाने वापरली जाते, तसेच नववधूने प्रथम वर्षी संक्रांत साजरी करू नये ह्या कल्पना डोक्यांतून काढून टाकाव्यात. अंधःकार नष्ट करण्यासाठीच ह्या सणाचे प्रयोजन असल्यामुळे कोणताही वाईट अर्थ ह्याच्याशी निगडीत करू नये.

सुरत, बडोदा, अहमदाबाद व उर्वरित गुजरातमध्ये संक्रांतीच्या दिवशी अक्षरशः सर्वजण देहभान विसरून पतंग उडविण्यात मग्न असतात. बहुधा हा सूर्याला सूत (कापसाचे वस्त्र) वहाण्याचा प्रकार असावा असे वाटते. हे पतंग उडविताना बघणे हा सुध्दा एक दैवी आनंद असतो.

सुख, समृध्दी, आनंद, सामर्थ्य, उत्साह व तारुण्य मिळण्यासाठी संक्रमण पर्व काळात समुद्रस्नान करावे.



## १७. महाशिवरात्र

माघ वद्य चतुर्दशीला मध्यरात्री १२ ज्योतिर्लिंगाची निर्मिती झाल्यामुळे माघ महिन्यातील चतुर्दशीला 'महाशिवरात्र' असे म्हणतात. इंग्रजी मार्च महिन्यात हा सण येतो.

भगवान शंकराची भारतात अनेक शिव मंदिरे असून त्यातील १२ ज्योतिर्लिंगावर शिवभक्तांची अत्यंत श्रध्दा आहे. ती खालीलप्रमाणे :-

१) सोमनाथ - सौराष्ट्र, गुजरात
२) श्री शैल्य - मल्लिकार्जुन, आंध्रप्रदेश
३) महाकाल - उज्जैन, मध्यप्रदेश
४) ओंकारेश्वर - अमलेश्वर, मध्यप्रदेश
५) वैजनाथ - परळी, महाराष्ट्र
६) भीमाशंकर - पुणे, महाराष्ट्र
७) श्री रामेश्वर - रामेश्वर, तामिळनाडू
८) श्री नागनाथ - मराठवाडा, महाराष्ट्र
९) श्री काशिविश्वेश्वर - वाराणसी, उत्तरप्रदेश
१०) त्र्यंबकेश्वर - नाशिक, महाराष्ट्र
११) केदारनाथ - हिमालय, हिमाचल प्रदेश
१२) घृष्णेश्वर - वेरूळ, महाराष्ट्र



तसेच गोकर्ण महाबळेश्वर हे कर्नाटकातील स्थान प्रसिध्द आहे. ह्याची ख्याती अशी की, त्याच्या दर्शनाने १२ ज्योतिर्लिंगाच्या दर्शनाचा लाभ मिळतो. अशीच फलप्राप्ती महाराष्ट्रातील रायगड जिल्ह्यात असलेल्या श्रीवर्धन येथील श्रीहरिहरेश्वराच्या दर्शनाने मिळते. नेपाळमधील पशुपती हे पण स्वयंभू शिवलिंग आहे. ह्या सर्व तीर्थस्थानी महाशिवरात्रीला व सोमवारी दर्शनासाठी भाविक गर्दी करतात.

भगवान श्री शिवास विशेष प्रिय असणाऱ्या गोष्टी म्हणजे रुद्राक्ष, भस्म, बेल, आंब्याचा मोहोर, गोकर्णाचे व धोत्र्याचे फूल, नृत्य, गायन, संगीत तसेच स्मशानातील एकांत. मानवतेच्या कल्याणासाठी जो विष प्राशन करतो



तोच नीलकंठ अथवा शिव होय.

नित्य, पक्ष, मास, योग व महा असे शिवरात्रीचे ५ प्रकार आहेत. शिवाचे सगुण व निर्गुण असे २ प्रकार आहेत. त्यात पार्वतीचे प्रतिक **'शाळुंका'** व त्यावर शिव प्रतिक म्हणून 'लिंग'-आत्मलिंग म्हणून या निर्गुणरुपात श्री शिवाची आराधना प्रचलित आहे.

शिवरात्रीला महादेवाचे मंदिरात गेल्यावर प्रथम नंदीचे दर्शन घ्यावे. (नंदी हे वाहन प्रजापती दक्षाने शिवास दिले. त्याची भक्ती पाहून भाविक 'प्रथम' तुझे दर्शन घेतील व नंतर माझे दर्शन घेतील', असा नंदीला आशिर्वाद दिला.) नंतर द्वारातील वीरभद्राचे दर्शन घेऊन गाभाऱ्यात जावे. दोन्ही हातांनी पिंडीला स्पर्श करून टाळी वाजवून 'शंभो हर हर महादेव' हा घोष करावा. महादेवाला पूर्ण प्रदक्षिणा घालू नये. तसेच पिंडीभोवती असलेली शाळुंका योनीरुप असल्याने ओलांडू नये भगवान शंकरास पूर्ण प्रदक्षिणा घालत नाहीत.

शिवभक्ताने गळ्यात रुद्राक्ष धारण करावा. अंगावर भस्माचे पट्टे धारण करावेत. पिंडीवर अंखड जलधारा असावी. अभिषेकासाठी रुद्र व महिम्न यांचे पठन करून, शिवसहस्त्रनामाने बिल्वार्चन करावे. शिवरात्रीचे पाच प्रकार वर आले आहेतच. या दिवशी पूजा, उपवास व जागरण करावे. त्रयोदशीला एक वेळ जेवून उपवास करावा. तसेच शिवरात्रीला पूर्ण उपवास करून दुसऱ्या दिवशी गोड जेवणाचा नैवेद्य दाखवून उपवास सोडून शिवव्रताची सांगता करावी. पूर्ण दिवस म्हणजे आदल्या दिवशी पहाटेपासून शिवरात्राचे रात्री २॥ वाजेपर्यंत पठण व उपवास करून मगच सांगता करावी कारण भगवान विष्णुंनी १ लक्ष बिलर्वाचन करून शिवरात्र उत्सव साजरा केला.

शंकराची उपासना करण्यामागे दोन उद्देश असतात. एक तर हलाहल प्राशन करून सृष्टीला वाचविल्याबद्दल नीलकंठाचे आभार मानणे व दुसरे म्हणजे मृत्यूसुध्दा टाळू शकेल अशा शक्तिची सेवा करणे.

# १८. होळी पौर्णिमा





हिंदु संवत्सरातील सर्वात शेवटचा सण म्हणजे होळी. प्रस्तुत पुस्तक लिहिण्याची प्रेरणा व गरज ह्या सणामुळे नकळत मिळाली. गेल्यावर्षी होळी दर्शनाला गेलो असता काही महिला नैवेद्य दाखवित होत्या. एक गंमत म्हणून एका गृहिणीस "हा नैवेद्य तुम्ही कोणाला दाखविता ?" असे विचारले. त्या गृहिणीने "होळीला" असे उत्तर दिले. कुतुहुल चाळवल्याने हाच प्रश्न आणखी कांही उपस्थित महिलांना विचारला. कोणी "शंकराला", कोणी "देवीला" किंबहुना "अग्निला" अशी उत्तरे मिळाली. त्यात पण हवी तितकी खात्री दिसेना. त्याचवेळी ५-६ वर्षाच्या मुलांपासून कॉलेज तरूणांपर्यंत बरेच जण होळीसमोर बोंब मारून, कोणाच्या ना कोणाच्या नावाने शिव्या देत होते. त्यांना विचारले की "तुम्ही असे कां बरे करता तर " सगळेच जण शिव्या देतात म्हणून आम्ही पण देतोय" असे "मॉब मेंटॅलिटी"चे उत्तर मिळाले.

ह्या अज्ञानाला आपण जबाबदार आहोत असे प्रकर्षाने जाणवले. दोष सध्याच्या पिढीचा नसून त्यांना योग्य माहिती वेळोवेळी न देणाऱ्यांचा आहे. विभक्त कुटुंब पध्दतीत आजी-आजोबा हे कलम बऱ्याच घरातून बाद झाले आहे. माहितीचा एक स्त्रोत आटला आहे. तेव्हा मनात आले की सर्व सणांविषयी थोडक्यात पण आवश्यक अशा माहितीचे छोटे पुस्तक लिहावे. ही पूर्वपिठिका

सर्वसाधारणपणे मार्चच्या मध्यावर येणारा होळी हा सण म्हणजे फाल्गुन शुध्द पौर्णिमा होय. ह्या सणाविषयी अनेक कथा प्रचलित आहेत परंतु धुंडा राक्षशिणीविषयीची कथा शास्त्रसंमत मानली जाते.

धुंडा राक्षशिण ही देवीचा अंश असलेली राक्षशिण होती. तिने भगवान श्री शंकराची उग्र उपासना करून त्याला प्रसन्न करून घेतले. त्यावेळी तिने शंकराकडे वर मागितला की, "मला बालके भक्षण करण्याची मुभा असावी." शंकर उत्तरले, " तथास्तु ! रंभेची मुले तुला खावयास हरकत नाही. तसेच तुला अपशब्दाने संबोधतील त्या बालकांचे तुला रक्षण करावे लागेल."

रंभा म्हणजे केळ. रंभेची मुले म्हणजे केळी. होळीमध्ये व्यायलेली केळ मध्यभागी ठेवण्याची कारणमीमांसा ही आहे. त्याचप्रमाणे होळीसमोर उभे राहून अपशब्द उच्चारत बोंब मारण्यामागे ही कथा आहे.

होळीला वरण-भात, वडे, पुरणपोळी हा नैवेद्य होळीत बसलेल्या हुंडा राक्षशिणीला दाखविला जातो. होळीचा उजेड जिथपर्यंत जातो त्याच्या पलिकडे जाण्याची तिला विनंती केली जाते. तिला अर्पण केलेला नारळ प्रसाद म्हणून वाटण्याची पध्दत आहे.

होळी साजरी करण्यामागे सर्व अशुभ गोष्टींचा नाश करण्याची संकल्पनांपण आहे. त्यामुळेच होळीच्या दुसऱ्या दिवशी म्हणजे धुळवडीला पहाटे घरातील कचरा काढून, केरसुणीसकट, तो वेशीबाहेर टाकला जातो. घरातील अमंगल गोष्टींचा त्यामुळे नायनाट होऊन नष्टचर्य संपते ही भावना!

होळी उभी करण्याचीसुध्दा विशिष्ट पध्दत आहे. कमीत कमी तीन फुट व्यासाचे वर्तुळ काढून जमिनीत दीड फुट खोल खड्डा खणावा. त्यात व्यायलेली केळ मध्यभागी रोवून शेणाने जमिन सारवावी. इतर लाकूड-फाटा शंकूच्या आकारात (पिरॅमिड) उभा करावा. शंकूच्या टोकदार भागातून शुध्द शक्तीचा प्रवेश होतो आणि होळीचा उजेड दूरवर पसरतो. व्यायलेली केळ ठेवण्याचे कारण वर सांगितले आहे. त्यानंतर होळीची पूजा करून तिला प्रज्वलित करावे. नंतर वर सांगितल्याप्रमाणे नैवेद्य दाखवून पेटत्या होळीत टाकावा. मुला-बाळांचे रक्षण करण्याची प्रार्थना हुंडा राक्षशिणीला करावी.

कोकणातील कांही ठिकाणी होळी हा सण फाल्गुन शुध्द पंचमी पासून पौर्णिमेपर्यंत साजरा करतात. होळीवरच पाणी तापवून, होळीतील राख अंगाला लावून, धुळवडीला स्नान करतात. होळीतली रक्षा औषधी असल्याचा समज आहे.

उत्तर हिंदुस्थानात होळी फार मोठ्या प्रमाणात साजरी होते व धुळवडीलाच रंगपंचमी खेळतात.

महाराष्ट्राच्यासुध्दा कांही भागात धुळवड दंगामस्ती करून, रंग खेळत, दारू पिऊन गोंधळ करत साजरी करतात. त्याला शास्त्रीय आधार नाही.